## परंधाम प्रकाशनचीं ग्रामोपयोगी पुस्तकें

भूदानगंगा, भाग १ ते ९ [सेट]
महाराष्ट्रात विनोबा भा. १ ते ४ [सेट]
१९५७ च्या क्रांतीचा उषःकाल
एकीने रहा, नेकीने वागा
ग्रामदान संगीत
व्यापाऱ्यांना आवाहन
सर्वोदयपात्र का व कसे ?
सर्वोदयाचे आधार
सर्वोदयाची त्रिविध घोषणा
विनोबांची भारत-यात्रा
भूदानयज्ञ समग्र दर्शन
भारतातील भूमिहीन आणि भूदान
संपत्तिदान यज्ञ
नवे आचार, नवे विचार
ग्रामपंचायत [सुलभ विवरण]
संरक्षण आणि सर्वोदय
खेड्याचें बंड

समग्र पुस्तकांसाठी नवीन सूचिपत्र मागवा —

परंधाम प्रकाशन, पौ. पवनार
जि० वर्धा (महाराष्ट्र)

ज्यानी विरोधरहित बंडाची नि
संघर्षरहित क्रांतीची दीक्षा
दिली आणि काही लेखन करू
शकेन अशा योग्यतेचे बनवले,
त्या—

पूज्य श्री धीरेंद्रभाईंना
सादर समर्पण

— राममूर्ति

# विषय-सूचि

पृष्ठ संख्या

# खेड्याचे बंड

## गांव आहेच कोठे ? : १ :

इतराप्रमाणे मीहि अैकत आला होतो, वाचत आलो होतो, भारत-वर्ष हा मुख्यत. खेड्याचा देश आहे. वास्तविक गोष्ट अशीच आहे. ती सिद्ध करण्यासाठी आकडेबाजी करण्याची जरूर नाही. म्हणून मी १९५४ साली नोकरी सोडून, पहिल्या प्रथम खादीग्राममधे नुकत्याच सुरू झालेल्या श्रमभारतीत दाखल झालो त्या वेळी माझ्या मनात ही भावना होती की खेड्याचा जो सच्चा भारत आहे त्यात काम करण्यासाठी मी जात आहे. ग्रामीण जीवनाचे जें चित्र त्या वेळी माझ्या मनात होते त्यामधे २५–३० वर्षांपूर्वी ग्राम-जीवनावर वाचलेल्या काही कवितांचा रंगहि अद्याप शिल्लक होता. मानले होतें की खेड्यातील लोक खूप सीधे-सरळ व भले असतात शहरातील लोकांप्रमाणे त्यांच्यात कृत्रिम व क्षुद्र व्यावहारिक वृत्ति नसते. ते गरीब व अस्वच्छ भले असोत, पण त्यांच्यात माणुसकी अधिक असते माझ्या चित्तात खेड्याचें जें चित्र होतें तें अनेक वर्षांपासून याच रंगाने रंगलेलें होतें.

श्रमभारती अेक शिक्षण-संस्था होती. पण ती इतर संस्थाहून फार निराळी होती. सकाळी उठल्यापासून तो रात्री निजेपर्यंत दिनक्रम अगदी पक्का बांधलेला. माझ्यासाठी तर पूर्वीचे सारे शिक्षण विसरून नव्या पद्धतीनें नवें शिक्षण घेण्याची ती बाब होती. सकाळी शेतात काम करीत असे, दुपारी विद्यार्थ्यांना शिकवीत असे व कार्यालयाचे काम पाहत असे. परंतु, संस्थेत राहून सुद्धा, मी दर आठवड्याला जवळच्या खेड्यात जात असे. तेथील घाणेरडी मुलें, गवताची घरे, व खाच-खळग्याचे रस्ते पाहून वारंवार मनात येई की खेडुत आपआपल्यापरी फार चांगले तर आहेत पण अडाणी हि फार आहेत. ते गरीब आहेत याचे कारण ते अशिक्षित व

उपेक्षित आहेत. सरकार जर लक्ष देईल तर त्यांची अशी परिस्थिति राहणार नाही. मला त्यांच्या जीवनात ज्या उणीवा दिसत होत्या त्या सर्वांचा संबंध मी त्यांचा आळस व अज्ञान यांच्याशी जोडत होतो मनात विचार येई की विज्ञानाच्या या युगातहि लोकांना सुख मिळत नसेल तर याला मूर्खपणाशिवाय दुसरे काय म्हणायचे ? बस, मन असे सांगत असे की जर शिक्षणाचा प्रसार झाला व वैज्ञानिक साधने सुरू झाली तर खेड्यातील सुंदर प्राकृतिक सृष्टि व तेथील चांगली भली माणसे या दोहोंचा मिलाफ होऊन अेक सुसघटित व भव्य जीवनाचा नमुना तयार होऊ शकेल

असे केव्हा होईल हे सांगणे कठिण आहे. पण त्यावेळी मी अेमेच मानीत होतो आणि असे मानूनच आपल्या शक्तीबाहेर काम करून सुद्धा थकत नव्हतो. शहरातील आरामाचे जीवन सपले, मित्रांचा सहवास सुटला, जीवनाचा मार्ग बदलला याबद्दल कधी खेद वाटला नाही. उलट, उपेक्षित, तिरस्कृत, शोषित ग्रामीण मानवाची माझ्याकडून काही सेवा होत आहे याबद्दल माझ्या मनाला आनंद वाटत होता वेळेवर खायला मिळाले नाही, कच्च्या रस्त्यावरून चालतांना पाय चिखलाने भरले, वृत्तपत्रे बरोबर वाचायला मिळाली नाहीत इत्यादि अनेक विविध अडचणी आपोआप विसरल्या जात अशा वेढयी जीवनक्रमातसुद्धा अेक विशेष प्रकारची मजा वाटत असे.

अशा रीतीने राहता-राहता अेक-दोन नाही, पूर्ण पाच वर्षे निघून गेली. १९५७ मध्ये अेक दिवस गावात फिरता फिरता मनात आले की काही झाले तरी सत्या ही सत्याच आहे – खेड्यात असली तरी ! शहर सोडून खेड्यात आलोच आहोत तर मग सत्येचे बधन कशाला ? मग खेड्यातच का राहू नये ? आपल्यात व गाववाल्यात अेक प्रकारचे दूर-पणाचे अतर कशाला ठेवायचे ? जर खेड्यातच काम करायचे आहे तर खेडुत होऊनच खेड्यात राहिले पाहिजे जसजसे दिवस जात होते तसतसा हा विचार पक्का होत गेला. तरीसुद्धा जवळ जवळ दीड वर्ष निघून गेले पण काही मार्ग सुचला नाही

सरतेशेवटी १९५९ च्या जानेवारीत अेके दिवशी आम्ही काही साथी – स्त्री पुरुष दोन्ही – निघालो आणि नदीकाठच्या अेका गावात जाऊन पोहोचलो गावातील काही प्रमुख लोकांशी चर्चा झाली त्यांनी चागले स्वागत केले, आणि खूप प्रसन्नता दाखविली व आमच्या सेवा-भावाचा आदर केला आम्ही त्याच्या गावात काही सेवा-कार्य करण्याचे ठरविले या गोष्टीमुळे गाववाले इतके खूप झाले की जणू काही आम्ही त्याच्यावर उपकारच करीत आहोत ! लागलीच राहण्यासाठी म्हणून जयरामपताचे अेक लहानस घर निवडले गेल जागेत त्याची व त्याच्या अलग राहणाऱ्या भावाची गुरेढोर बाधली जात होती काही तरुणानी मिळून शेणपाणी आणल, सर्वांनी मिळून झाडझूड केली, शेणाने सारवले व घरून अेक मोठासा तख्तपोस आणून माडून ठेवला तेथे स्वयपाकाला अलग जागा नव्हती की स्नानासाठी न्हाणीघर नव्हते की शौचादीसाठी काही व्यवस्था नव्हती अेका ल्हानशा पडवीत (खोली तर नव्हतीच) आम्ही सात माणसे (५ पुरुष व २ स्त्रिया) सारे राहायला लागलो विचार केला की जर खेड्याचे काम करायच आहे तर आपल्या स्वत च्या सोयी-गैरसोयीकडे काय लक्ष द्यायचे ? खरोखरच भावनेतसुद्धा किती शक्ति असते ! !

सायकाळी देवस्थानच्या पिपळाखाली सामूहिक प्रार्थना व त्यानतर आपसातील चर्चेच्या कार्यक्रमाला सुरुवात झाली लहान-थोर, तरुण-वृद्ध, स्त्री पुरुष सर्वामध्ये उत्साह दिसत होता "किती चागल लोक आहत हे, आपले घरदार, सुखसोयी सर्व काही सोडून आमच्यामध्ये आले आहेत. त्याना कोणत्याहि प्रकारचा त्रास होता कामा नये, कोणत्याहि प्रकारचा परकेपणा वाटता कामा नये," अशा त हेची भावना गाववाल्याच्या प्रत्येक कामात आमच्याबद्दल दिसून येत होती अेके दिवशी आमच्या सूचनेवरून, गावामधील ६–७ वर्षाच्या बालकासाठी अेक बाल मदिर सुरू करण्याचे त्यानी ठरविले (मोठ्या मुलासाठी गावात अेक शाळा होतीच ) चर्चा झाल्याबरोबर अदाज पत्रक तयार झाले, वर्गणीचे आकडे पडले, व श्रम-दानाची योजना तयार झाली अेका दोघानी असाहि उत्साही इशारा केला

उपेक्षित आहेत सरकार जर लक्ष देईल तर त्याची अशी परिस्थिति राहणार नाही मला त्याच्या जीवनात ज्या उणीवा दिसत होत्या त्या सर्वांचा संबंध मी त्याचा आळस व अज्ञान याच्याशी जोडत होतो मनात विचार येई की विज्ञानाच्या या युगातहि लोकाना सुख मिळत नसेल तर याला मूर्खपणाशिवाय दुसरे काय म्हणायचे ? बस, मन असे सांगत असे की जर शिक्षणाचा प्रसार झाला व वैज्ञानिक साधने सुरू झाली तर खेड्यातील सुंदर प्राकृतिक सृष्टि व तेथील चांगली भली माणसे या दोहोंचा मिलाफ होऊन अेक सुसघटित व भव्य जीवनाचा नमुना तयार होऊ शकेल

असे केव्हा होईल हे सांगणे कठिण आहे. पण त्यावेळी मी असेच मानीत होतो आणि असे मानूनच आपल्या शक्तीबाहेर काम करून सुद्धा थकत नव्हतो. शहरातील आरामाचे जीवन सपले, मित्राचा सहवास सुटला, जीवनाचा मार्ग बदलला याबद्दल कधी खेद वाटला नाही उलट, उपेक्षित, तिरस्कृत, शोषित ग्रामीण भारताची माझ्याकडून काही सेवा होत आहे याबद्दल माझ्या मनाला आनंद वाटत होता वेळेवर खायला मिळाले नाही, कच्च्या रस्त्यातून चालताना पाय चिखलाने भरले, वृत्तपत्रे बरोबर वाचायला मिळाली नाहीत इत्यादि अनेक विविध अडचणी आपोआप विसरल्या जात अशा वेगळी जीवनक्रमातसुद्धा अेक विशेष प्रकारची मजा वाटत असे.

अशा रीतीने राहता-राहता अेक-दोन नाही, पूर्ण पाच वर्षे निघून गेली १९५७ मध्ये अेक दिवस गावात फिरता फिरता मनात आले की काही झाले तरी सत्य हो सत्यच आहे – खेड्यात असली तरी ! शहर सोडून खेड्यात आलोच आहोत तर मग सत्याचे बंधन कशाला ? सरळ खेड्यातच का राहू नये ? आपल्यात व गाववाल्यात अेक प्रकारचे दूर-पणाचे अंतर कशाला ठेवायचे ? जर खेड्यातच काम करायचे आहे तर स्वेद्गत होऊनच खेड्यात राहिले पाहिजे. जसजसे दिवस जात होते तसतसा हा विचार पक्का होत गेला तरीसुद्धा जवळ जवळ दीड वर्ष निघून गेले पण काही मार्ग सुचला नाही

सरतेशेवटी १९५९ च्या जानेवारीत अेके दिवशी आम्ही काही साथी – स्त्री-पुरुष दोन्ही – निघालो आणि नदीकाठच्या अेका गावात जाऊन पोहोचलो. गावातील काही प्रमुख लोकांशी चर्चा झाली. त्यांनी चांगले स्वागत केले, आणि खूप प्रसन्नता दाखविली व आमच्या सेवा-भावाचा आदर केला आम्ही त्यांच्या गावात काही सेवा-कार्य करण्याचे ठरविले या गोष्टीमुळे गाववाले इतके खूप झाले की जणू काही आम्ही त्यांच्यावर उपकारच करीत आहोत! लागलीच राहण्यासाठी म्हणून जयरामपंताचे अेक लहानसे घर निवडले गेले त्या जागेत त्यांची व त्यांच्या अलग राहणाऱ्या भावाची गुरे-ढोरे बांधली जात होती काही तरुणांनी मिळून शेणपाणी आणले, सर्वांनी मिळून झाडझूड केली, शेणाने सारवले व घरून अेक मोठासा तख्तपोस आणून मांडून ठेवला तेथे स्वयंपाकाला अलग जागा नव्हती की स्नानासाठी न्हाणीघर नव्हते की शौचादीसाठी काही व्यवस्था नव्हती अेका लहानशा पडवीत (खोली तर नव्हतीच) आम्ही सात माणसे (५ पुरुष व २ स्त्रिया) सारे राहायला लागलो विचार केला की जर खेड्याचे काम करायचे आहे तर आपल्या स्वतःच्या सोयी-गैरसोयीकडे काय लक्ष द्यायचे ? खरोखरच भावनेतसुद्धा किती शक्ति असते!!

सायंकाळी देवस्थानच्या पिंपळाखाली सामूहिक प्रार्थना व त्यानंतर आपसातील चर्चेच्या कार्यक्रमाला सुरुवात झाली लहान-थोर, तरुण-वृद्ध, स्त्री-पुरुष सर्वांमध्ये उत्साह दिसत होता "किती चांगले लोक आहेत हे; आपले घरदार, सुखसोयी सर्व काही सोडून आमच्यामध्ये आले आहेत. त्यांना कोणत्याहि प्रकारचा त्रास होता कामा नये, कोणत्याहि प्रकारचा परकेपणा वाटता कामा नये," अशा त-हेची भावना गाववाल्यांच्या प्रत्येक कामात आमच्याबद्दल दिसून येत होती. अेके दिवशी आमच्या सूचनेवरून, गावामधील ६–७ वर्षांच्या बालकासाठी अेक बाल मंदिर सुरू करण्याचे त्यांनी ठरविले (मोठ्या मुलांसाठी गावात अेक शाळा होतीच.) चर्चा झाल्यावरोबर अंदाज-पत्रक तयार झाले, वर्गणीचे आकडे पडले, व श्रम-दानाची योजना तयार झाली अेका दोघांनी असाहि उत्साही इशारा केला

की जवळच अेक रेल्वे लाईन तयार होत आहे जर रात्रीच्या अंधारात थोडी हिंमत दाखविली तर लोखंडाचे काही बीम सहज हाती लागू शकतील. चांगल्या उद्देशाच्या पूर्तीसाठी वाईट काम करावे लागले तरी काय हरकत आहे ? योग्य-अयोग्यतेचा संकोच पुष्कळसा सुटला आहे

बालमंदिर हें सुरवातीचे अेक हलकेसे काम होतें. खरोखरी आमच्या मनात होते की गावातील शेतीमधे दर अेकरी उत्पादन वाढवावे, आबाल-वृद्ध सर्व स्त्री-पुरुषाना साक्षर करावे, घरोघर पायखाने व मुऱ्या बनवाव्यात, निर्धूम स्वयपाक-घरे बनवावीत, सायंकाळी सामूहिक प्रार्थना व्हावी, कोणी आजारी पडल्यास त्याचा इलाज व देखरेख करण्याची व्यवस्था गावातर्फे व्हावी, आप-आपसातील जे वादविवाद किंवा झगडे असतील त्याचा निवाडा आपसात तडजोडीने करावा, मुलकी किंवा फौजदारी कोर्ट-कचेरीत जाण्याचा प्रसंग येऊ नये, भूमिहीनास जमीन मिळावी, बेकाराना उद्योग मिळावा, पुऱ्या गावाची अेक सम्मिलित आर्थिक योजना बनावी व संपूर्ण गाव अेक स्वयपूर्ण विद्यालय मानले जाऊन प्रत्येक व्यक्तीचा बौद्धिक व सास्कृतिक स्तर उंच करण्याचा प्रयत्न केला जावा अशा रीतीने लोकशिक्षण आणि बालशिक्षण याच्या सम्मिलित प्रक्रियेने तो दिवस लौकर उजाडावा, ज्यामुळे संपूर्ण गाव अेका मोठ्या व्यापक कुटुंबासारखें दिसू लागेल – अभावमुक्त, अज्ञानमुक्त, अन्यायमुक्त सर्व सुखी, सर्व समृद्ध, सर्व शिक्षित, सर्व स्वस्थ. संपूर्ण गावाच्या समग्र आरोहणाची पुरी क्रांतिकारी प्रक्रिया आम्हा मंडळींच्या मनात होती, व गाववाल्याना त्यात सामील करण्यास आम्ही अगदी अधीर झालो होतो गावातील जे लोक आमच्याजवळ वरच अधिक उठत-बसत असत ते [आमच्या म्हणण्याला] 'हो'च म्हणायचे, 'नाही' कधीच म्हणायचे नाहीत असे वाटत होते जणू काही प्रत्येक मनुष्य सर्व काही करण्यास तयार आहे

मोठ्या उत्साहात बालमंदिराचा कार्यक्रम चालू झाला, दिवस अेका-मागून अेक जात होते. बालमंदिरात मुलाची संख्या वाढू लागली. वाटू लागले की गावाच्या विकासाचा मार्ग खुला होत आहे आम्ही मंडळींनी ठरविलें होतें की कोणत्याही कुटुंबातील लहान बालक बालमंदिरात भरती

झाल्याशिवाय राहू नये. दगडुभाऊ जवळच राहात होते. पण त्याचा लहान मुलगा मात्र बालमंदिरात येत नव्हता. म्हणून मी अेके दिवशीं संध्याकाळीं स्वतः त्याच्या घरी गेलो. दगडूभाऊ विडी ओढत आपल्या घराच्या दारात बसले होते. मला पाहताच उभे झाले आणि माझ्यासाठी जमिनीवर घोंगडी आयरत म्हणाले, "धन्य आहे भाग्य आमचे ! आज घरी येणे केले ?"

मी विचारले, "का हो दगडुभाऊ, तुम्ही आपल्या मुलाला बाल-मंदिरात का नाही पाठवत ?"

"पाठवणार का नाही, गुरुजी ?" अेवढें बोलून तो गप्प राहिला. थोडे थांबून मी फिरून म्हटले, काही अडचण असेल तर सांगा. दोन-चार दिवस तुम्ही स्वत. त्याला आणून पोहोचवाल तर त्याला सवय होईल व मग तो स्वत च आपणहून यायला लागेल. काय, ठीक आहे ना ?" "हो ऽऽ ठीक तर आहे !" त्याने जरा जड आवाजात म्हटले

"खरे खरे सांगा ! अडचण काय आहे ?"

"अडचण काही नाही तशी, गुरुजी. पण कधी कधी माझ्या डोक्यात असा विचार येतो की हा मुलगा मोठा झाल्यावर याला मालकाच्या शेतात नांगर जुंपूनच पोट भरावे लागणार. दुसरे याच्या नशिबात काय आहे ? आणि याला सरतेशेवटी नांगरच जुंपायला लागणार आहे तर बालमंदिरात जाणे याच्या काय कामाला येईल ? म्हणून तितका वेळ त्याने आपल्या बहिणीबरोबर बकऱ्या का चारू नयेत ?" एवढें बोलून तो गप्प बसला.

३० वर्षांचा तरणाबांड, हसतमुख, मेहनती, मनमिळाऊ, प्रत्येक कामात आघाडीवर असणारा हा दगडूभाऊ, याच्या तोंडून अशा तऱ्हेची गोष्ट ऐकायला मिळेल असे मला स्वप्नातसुद्धा वाटले नव्हते. 'आपल्या मुलाला बालमंदिरात पाठव' असे पुन्हा सांगण्याची माझी हिंमत झाली नाही. त्याच्यात मी विश्वास कसा उत्पन्न करू शकलो असतो की त्याचा मुलगा काय किंवा शिवाजीरावाचा मुलगा काय, सर्वांनाच उद्याच्या जगात समान संधी मिळणार आहे ? मनुष्य जें प्रत्यक्ष पाहतो, स्वतःच्

त्याचा विश्वास बसतो यानंतर त्याचा मुलगा कधी कधी दुसऱ्या मुलां-बरोबर स्वखुशीने बाल्मंदिरात येत असे

ही गोष्ट १९५९ मधली यापूर्वी अशाच तऱ्हेचा एक प्रसंग १९३३ मधे घडला होता महात्मागांधींनी हरिजनांच्या प्रश्नावरून उपवास सुरु केला होता त्यावेळी मी कॉलेजमधे शिकत होतो त्यांच्या उपवासाचा विद्यार्थ्यांवर व शिक्षकांवर खूप खोल परिणाम झाला मी व माझा एक मित्र दोघांनी ठरविले की सध्याकाळी रोज भंगीवस्तीत जाऊन एक तास शाळा चालवायची आमच्या वसति-गृहाच्या अगदी मागेच भंगी-वस्ती होती वर्ग संपल्यानंतर आम्ही दोघे तेथे गेलो. एक तरुण निंबाच्या झाडाखाली पायखान्याजवळच निजला होता. आम्हाला ओळखत होता पाहिल्याबरोबर उठून उभा राहिला आणि म्हणाला "साहेब, इकडे कुणीकडे आज ?" मी म्हटले, "माहीत आहे का महात्माजींनी हरिजनां-साठी उपवास सुरू केला आहे ?"

"हो, ऐकले आहे" उत्तर मिळाले

"तर मग आमचा विचार आहे की रोज सायंकाळी एक तास तुमच्या वस्तीत शाळा चालवावी म्हणजे तुम्हा सर्व लोकांना शिकता येईल."

"धन्य भाग्य आमचे साहेब ! पण..." एवढें बोलून तो गप्प झाला.

"का, काय झाले ? बोल की" मी म्हटलें.

तो म्हणाला "ठीक आहे. पण मनात विचार येतो की लिहिण, वाचणं शिकून आम्ही शेवटी पायखानाच साफ करणार ना ? आणि जर केला नाही तर उपाशी मरण्याशिवाय दुसरा काय मार्ग आहे?" मी ऐकतच उभा राहिलो. या वेळीहि मला काही उत्तर सुचले नाही. एवढेच झाले की दुसऱ्या दिवशी शिकवायला जायची हिंमत झाली नव्हती. १९३३ साली त्या मग्यासमोर मी निरुत्तर झालो होतो आणि आज २६ वर्षानंतर १९५९ साली मला दगडुमाऊ समोर पुन्हा निरुत्तर व्हावें लागले. आज तरी माझ्याजवळ काही उत्तर नाही. अन्य कोणा-जवळ आहे ?

रामचद्रराव, गोविंदराव, शिवाजीराव योना बालमंदिराच्या बाबतीत एवढा उत्साह होता की ते ४२ हात लाबीचा पक्का हॉल बाधण्याचा विचार करू लागले होते आणि इकडे या दगडूभाऊच्या डोक्यात काही दुसरेच विचार घोळत होते. दोघाच्या विचार करण्याच्या भूमिकेत येवढे अतर ! मी वारवार विचार करीत होतो की असे का असावे ? या लोकाच्या व दगडूभाऊच्या जीवनात काही समान तत्त्व नाही ? गावात राहणारे सर्व लोक समानरूपाने एकदिल होऊन *'हा आमचा गाव आहे'* असे एका आवाजाने म्हणू शकतील, अशी एखादी सामान्य भूमिका नाही का ? त्यावेळी पहिल्या प्रथम हे प्रश्न माझ्या मनात निर्माण झाले होते. ग्रामीण जीवनाच्या या प्रश्नाकडे पूर्वी माझे कधीच लक्ष गेले नव्हते मी अगदी व्याकुळ झालो. मला काही सुचत नव्हते त्याच सुमारास एक दिवस बाजार करून येत असताना सडकेवर हरिभाऊ भेटले. मला पाहताच म्हणाले "भाऊसाहेब, आता तुमच्याशिवाय दु ख ऐकणारा दुसरा कोणी नाही " *मी विचारले, "काय भानगड आहे ?"* वेळात वेळ काढून, त्यानी आपले कुटुब व गोविंदरावाचे कुटुब याच्यातील वाडवडिलापासून देण्या-घेण्याचा सर्व इतिहास मला ऐकविला त्याच्या आज्याने किती रुपये कर्जाऊ घेतले होते, त्याच्या बापाने किती रक्कम परत केली, त्यानी स्वत किती दिले आहेत आणि कितीसाठी आज गोविंदराव लाठीवाल्यामार्फत, उभे पीक कापून नेण्याची धमकी देत आहे स्वत वर गुदरलेल्या या प्रसगावरोबरच जमिनी देणे-घेणे, जाती-पाती इत्यादि बाबत गांवात *चालू असलेल्या कित्येक झगड्याची माहिती त्यानी मला सांगितली मला* कल्पना नव्हती की अशा चागल्या गावातसुद्धा आतून-आतून इतके आपमात झगडे व दुरावे असतील ! !

*गोविंदराव मला मानीत असत गावातील एक प्रतिष्ठित व्यक्ति.* जवळ सुमारे १०० एकर चागली जमीन व हजारो रुपयाची सावकारी. मनुष्य स्वभावाने मनमिळाऊ. होळी-पौर्णिमेच्या दिवशी आम्ही सर्व मडळीनी त्याच्या घरी पुरणपोळीची मेजवानी झोडली होती. असा मनुष्यसुद्धा एवढा जुलूम करील हा विचार माझ्या मनाला शिवेच ना. हरिभाऊ

म्वाड नव्हते किंवा गोविंदरावही प्रतिष्ठाहीन नव्हते दोघेही एकाच गावात राहणारे एकाच धरतीमातेवर पोसले जाणारे पण दोघांच्या दुनिया दोन होत्या, जीवन जगण्याचे प्रकार दोन होते, स्वार्थ दोन होते, आकांक्षा दोन होत्या, विचार करण्याच्या पद्धतीहि दोन प्रकारच्या होत्या

द्वैत ! द्वैत !! द्वैत !!! मी ग्रामीण जीवनाकडे जसजसा खोल दृष्टीने पाहू लागलो, समजू लागलो, तसतसे प्रत्येक ठिकाणी मला द्वैतच द्वैत दिसू लागले सतत दीड वर्षांच्या अनुभवावरून मी शिकलो की ग्रामीण जीवनाचा ताणा दमनाचा आहे आणि बाणा शोषणाचा आहे आणि या ताण्या बाण्यापासून झालेल्या कपड्यामध्ये द्वैतच द्वैत आहे बलवान दुबळ्याला दाबून दमन करतो तर सधन निर्धनाला पिळून शोषण करतो कोणी कोणाला आपला म्हणून मानीत नाही जागजागी परकेपणाची व अविश्वासाची भिंत उभी आहे जाणून बुजून कोणी असे करतो असेहि नाही शतकानुशतके ग्रामीण जीवनाचा जो विकास होत आला आहे त्यात व्यवस्थाच अशी होऊन गेली आहे की मजूर व मक्त्यात नत करणारा (बटाईदार) यांना पिळले जाणे जितके स्वाभाविक आहे तितकेच मालक व सावकार यांनी पिळणे स्वाभाविकच आहे

याशिवाय दुसरे होऊ तरी काय शकले असते ? ज्या मजुरामार्फत गावात शेती पिकते त्या मजुराचे श्रम मालक वर्गाने व्याज कायदा व दडपयाच्या जोरावर आपल्या ताब्यात ठेवले आहेत अशा कमाईमार्फत गावात भांडवल एकत्रित होत असते याला शोषणाशिवाय आणखी काय म्हणणार ? जर मालकाची शेती नसेल आणि सावकाराचे भांडवल नसेल तर गरिबाने काम कसे चालेल ? तो काम कोठे करील ? पोट कसे भरील ? अडी अडचणीच्या वेळी रुपये कोठून आणील ? दमन व शोषण, अज्ञान व अविश्वास, अनीति व असहकार यांच्या लांबरुंद विशाल जगात मालक, धनिक, श्रमिक, उच्च-नीच हिंदु मुसलमान, आदिवासी, हरिजन या सर्वांची आपआपली एक दुनिया आहे एक दुसऱ्याहून अगदी निराळी आणि बहुधा एक दुसऱ्याच्या अगदी विरुद्ध असे असले तरी आपली दुनिया सोडून कोण कोठे जाणार ? दुसरा पर्याय काय ? वाडवडिलांच्या

वेळेपासून चालत आलेले जे आपले संस्कार व आपसातले संबंध आहेत त्याच्या आधारानेच प्रत्येक जण चालून राहिला आहे. प्रत्येक जण दुःखी आहे, चिंताग्रस्त आहे, पण आजपर्यंतच्या परिचित असुरक्षिततेतच सुरक्षितता मानून बसला आहे. म्हणून बदलत नाही एवढेच नव्हे, तर बदल करण्याच्या प्रश्नाचा विचारहि तो करीत नाही किंवा असेहि असेल की जो दबलेला आहे त्यात बदल करण्याची शक्ति नाही आणि जो दाबतो आहे त्याला बदल करण्याची इच्छा नाही. वाटते की जणू काही ग्रामीण समाजात बदलण्याची शक्तिच राहिली नाही. खरोखर, खेडेगाव म्हणजे असे एक स्थान झाले आहे जेथे प्रत्येक जण आपला आपण एकटा जगतो आणि आपला आपण एकटा मरतो आणि जोपर्यंत जगतो तोपर्यंत दुसऱ्याला गिळकृत करण्याचा प्रयत्न करतो. आजच्या गावात बंधुभाव नाही, कोणी दुसऱ्याबद्दल विचार करीत नाही किंवा सर्वांनी मिळून सामुदायिक रीतीने सर्वांसाठी काम करण्याची वृत्ति नाही.

एकदा 'पंच' या इंग्रजी वृत्तपत्रात एक व्यंग-चित्र आले होते एका अरुंद गल्लीच्या शेवटी दोन टोकांना दोन घरे आहेत दुसऱ्या मजल्यावर दोन्ही बाजूला दोन खिडक्या आहेत दोन्ही खिडक्यामधे एकेक मनुष्य उभा आहे. दोघेहि वाकून हात पुढे करताहेत, जसे काही हाताला हात मिळवू पहाताहेत शरीरे वाकलेली, हात पुढे केले आहेत, बोटे ताणली आहेत, एक हात दुसऱ्या हातापर्यंत पोहोचू शकत नाही. चित्रकाराने चित्राच्या खाली लिहिले होते त्याचा अर्थः 'पूर्व आणि पश्चिम दोन्ही कधी मिळणार नाहीत.' आज जवळ-जवळ दर दोन गावाच्यामधे, ( एका ) गावात दर दोन कुटुंबात, व पुष्कळशा कुटुंबात दर दोन व्यक्तीमधे हे चित्र टांगले जाऊ शकते. आपआपसातील चढाओढ, अविश्वास व गाढ अज्ञान याच्या झोक्यावर बसून गांवातील प्रत्येक मनुष्य झोके खात आहे आपल्याला कोण झोके देत आहे हे त्याला समजत नाही. कोठपर्यंत झोके खावे लागतील हेहि त्याला माहीत नाही. नेहमीच झोके खात आला आहे म्हणून तो आजहि झोके खात आहे एवढेच.

होता-होता पुरी दोन वर्षे होत आली. बालमंदिरात मोठ्या घरांतील काही थोडीशीच मुले राहिली. संपूर्ण गावासाठी एखादी योजना बनवावी याबद्दल आता चर्चासुद्धा नाही. तरीहि आम्हा मंडळींबद्दल लोक अजूनहि म्हणत आहेत – "ही माणसे भली आहेत" पण ते गाव कोठे आहे – एक गाव, सर्वांचे गाव, धनिकांचे गाव, गरिबांचे गाव, स्पृश्यांचे गाव, अस्पृश्यांचे गाव......की ज्या गावाची सेवा करायला आम्ही निघालो होतो ! इतक्या दिवसानंतर समजले की खरोखरच ज्याला आम्ही 'गाव' समजत होतो ते 'गाव' नव्हतेच. तो फक्त घरांचा एक पुंजका, एक घोळका होता. त्यांना एकमेकांशी जोडणारा कोणत्याहि प्रकारचा धागा नव्हता. इतकेच नव्हे तर त्या पुंजक्यामध्ये एकमेकांना अव्यवस्थितपणे जोडणारे जे काही धागे उरले आहेत ते बावरणाऱ्या बाबी मात्र अनेक आहेत. जेथे काही ग्रामभावना नाही, एकता नाही जेथे प्रत्येक व्यक्ति आपआपला स्वार्थ, लालसा, मैत्री व वैराची अलग-अलग जाळी गुंफून त्यात अडकून पडला आहे त्याला गाव म्हणता येईल ? अशा गावाची सामूहिक विकास-योजना कशी बनवणार ?

इतके दिवस गावात राहिल्यानंतर आम्हाला या मूलभूत सत्याचा पत्ता लागला. मन ही वस्तुस्थिति मानायला तयार होईना, पण वास्तविक परिस्थितीकडे किती दिवस डोळेझाक करणे शक्य आहे ? आता लक्षात आले की इतका प्रचाराकरिता खर्च होऊनसुद्धा गाव या कुशीवरून त्या कुशीवर का वळत नाही? कोरडेच का राहिले, व त्याचा सामूहिक पुरुषार्थ का प्रगट होत नाही ? जेथे खरा समुदायच नाही तेथे 'सामुदायिक' काय आणि 'विकास' काय ?

भारत पाच लक्ष गावांचा देश आहे का साडे आठ कोटी घरांचा ? ज्यांना आम्ही गाव म्हणून संबोधतो त्या ठिकाणी जवळ-जवळ वसलेल्या घरांच्या घोळक्याशिवाय अधिक काही आहे ?

• •

# विकास कोणाचा ? : २ :

दगडूभाऊच्या मनात आपल्या मुलाला बालमंदिरात पाठविण्या-विषयी उत्साह नव्हता. त्याच्या डोक्यात हेच घोळत होते की शिकून शेवटी मालकाच्या घरी गुलामीच करायची तर मुलाने लहानपणापासून धूळ-मातीतच का राहू नये ? भंगी-तरुणानेहि शिकण्याचा सल्ला मानला नाही. कारण त्याला वाटले, आपल्याला आजीविकेसाठी जन्मभर पायखानाच साफ करायचा आहे तर उगाच धडपड करून बुद्धीला फाटे का फोडावे आणि सभ्यजीवनाच्या भ्रमजालात अडकण्याचा प्रयत्न का करावा ? आपल्या मेहनतीचे फळ आपल्याला मिळेल असा जर त्याला भरंवसा वाटला तरच मनुष्य जीव तोडून मेहनत करील, तसेच आजच्या जीवनात जी बंधने व यातना त्याला भोगाव्या लागत आहेत त्यातून, नवीन विकसित जीवनामुळे, पूर्ण मुक्ति मिळेल असा ज्या वेळी त्याला भरवसा वाटेल तेव्हाच मनुष्य त्या नवीन विकसित जीवनाची गोष्ट ऐकायला तयार होईल. हा भरवसा १९३३ साली त्या भंगी तरुणाला नव्हता आणि आज १९५९ साली दगडूभाऊलाहि नाही

रामचंद्रराव, गोविंदराव, शिवाजीराव आदि लोकांना हा भरंवसा होता की आज ज्या सुखसोयी त्याना प्राप्त आहेत, समाजात जी त्यांची प्रतिष्ठा आहे, ती सर्व सुरक्षित राहील, इतकेच नव्हे तर पुढे ती वाढण्या-चीहि शक्यता आहे. कारण त्यांच्याजवळ ती सर्व साधने तयार आहेत, जी आजच्या समाजात मोठेपणासाठी आवश्यक मानली जातात. श्रेष्ठ जात, भरपूर परिवार, श्रीमंत सगे-सोयरे, पैसा, पत, अधिकार आणि प्रभाव. अशा बापाची मुले बालमंदिरात का नाही जाणार? ज्या आशेमुळे मन उल्हसित होते ती आशा दगडूभाऊच्या मनात का येत नाही ? कशी येणार? त्याच्या जीवनात त्या आशेला आधार आहे कोठे ? त्याच्याजवळ फक्त स्वतःचे श्रम आहेत आणि ते विकून तो स्वतःचे व आपल्या बायका-पोराचे पोट भरू शकतो. मक्त्याने थोडी जमीनहि करतो. पण तसल्या

जमिनीचा भरवसा काय ? मालकाची मागणी दर वर्षी वाढतच आहे. आता तर त्याना उत्पन्नाचा हिस्सा नको, ठराविक मण धान्य पाहिजे, मग तुमचें उत्पन्न कितीहि होवो. कित्येक वेळा तर उत्पन्नाच्या हिश्याऐवजी रोख रुपयाचा रोखा लिहून घेतात.

कोठें शिवाजीराव आणि त्यांचे सहव्यवसायी इतर मालक आणि कुठें दगडूभाऊ ! शिवाजीराव मालक आहेत, समृद्ध आहेत, दगडूभाऊ केवळ मजूरच नाही, दरिद्रीहि आहे. मालकाच्या दुनियेत वरण, भात, पोळी आहे, दूध-तूप आहे, दोव-चिवडा आहे, चटणी-लोणचें आहे. सणावाराच्या दिवशी त्याची मुलें नवीन कपडे घालून बाहेर पडतात. आजारी पडले तर त्यांच्या घरीं डॉक्टर येतो शाळेचे मास्तर त्यांच्या देवडीवरच राहतात आणि मुलांना सकाळ-संध्याकाळ शिकवितात. लग्न प्रसंगी दहा दहा हजाराचे हुंडे देतात व त्या समारंभात दहा दहा हजाराच्या पंक्ति उठतात. गावात कोणी अधिकारी किंवा पुढारी आला तर प्रथम त्यांच्याच उंबरठ्यावर जातो ग्राम-प्रमुखाच्या निवडणुकीसाठी ते स्वत. उभे राहोत किंवा न राहोत, गावात त्यांचेच चालते.

आता इकडे दगडूभाऊची स्थिति पाहा. त्याच्या मनात विचार येतो की शिवाजीराव जें मत देतात तेच मत आपणहि देऊ आणि निवडणुकीच्या वेळीं आपली सुनावणीहि पुष्कळ होते पण त्यानंतर त्याच्या भाकरीला किंवा त्याच्या इभ्रतीचा पत्ता नाही मताधिकाराने त्याला काय दिले ? त्याची मजूरी वाढली ? घर बनले ? जमीन मिळाली ? मालकांच्या रोजिंदारीची निश्चिती झाली ? बैल मेला तर दोन वर्षे किस्तन किंवा घेऊ शकला नाही, आणि सहकारी पेढीने कर्जहि दिले नाही. याशिवाय त्याच्या आयकारोगाना कोण आहे जो त्याना आपले मानील आणि त्यांना आपले समजतील ? ज्या दुनियेत दंडुका आहे, जबरदस्ती आहे, ध्याक-दट्टा आहे, मुनाफाखोरी आहे, मुकदमेबाजी पक्षबाजी, गटबाजी हें सर्व आहे त्यात त्याचें काय चालणार ? या दुनियेत हार खाऊन शिवरायांच्या शिष्याप्रमाणे त्याने आपली अलग दुनिया निर्माण केली आणि त्यात तो अडकून पडला आहे. कधी कधी तो ईश्वराच्या आशीने होरपळतो. पण जगा-

तील चागल्या वस्तु, भगवतान ज्याना मोठे केले आहे व समाजान ज्याना मोठे मानले आहे त्याच्यासाठी आहेत, लहानासाठी नाहीत, अशी मनाची समजूत घालून, आपल्या शिपल्यात तो लपून बसतो त्या ठिकाणी तो आशा निराशेच्या चढ उतारापासून मुक्त आहे त्या ठिकाणी तो आपल्या धगधगत्या आगीत जळण्यास स्वतत्र आहे आपली स्वतत्रता त्याने का गमवावी? आणि ही दुनिया कधी तरी बदलणारच आहे ही गोष्ट त्याने कशी मानावी ?

गावात घरे तर पुष्कळ आहेत पण अेकाचें घर दुसऱ्याच्या घरापासून जितकें जवळ आहे तितकेंच अेकाचे अत करण दुसऱ्याच्या अत करणापासून दूर आहे त्यामधे अेखादा असा कोणताहि ततु किंवा धागा नाही की जो अेकाला दुसऱ्याशी जोडू शकेल पन्नास कोसावर दूर राहणारा अेखादा कुटुबी किंवा नातलग आम्हाला प्रिय आहे त्याचें सुख त आमचे सुख आहे, त्याचें दु ख ते आमचे दु ख आहे पण अगदी आमच्या भितीच्याच पलीकडील आमचा शेजारी मात्र आम्हाला परका आहे बहुधा त्याचे सुख तें आमचें दु ख आणि त्याचें दु ख तें आमचें सुख होऊन जात आम्ही आणि आमचे शेजारी यामधे उच्च-नीच, गरीब श्रीमत स्वधर्मी विधर्मी, मित्र शत्रु इत्यादी जबरदस्त दुर्भेद्य भिती उभ्या आहेत ज्याने ग्रामीणजीवनाच्या आत घुसून हें समजून घेण्याचा प्रयत्न केला असेल त्याच्या लक्षात ही गोष्ट स्पष्ट येईल त्याच्या तावडतोब लक्षात येईल की कोट्यावधि रुपयाच्या खर्चाने चालणाऱ्या सामुदायिक विकास-योजनेची अशी स्थिति का होत आहे ?

असे नाही की गावात विकासाची कामे चालू नाहीत ती होत आहेत. इतकेच नव्हे तर ती फार होत आहेत पुस्तकालयें, शाळा, पचायत-घरे, विहिरी, सडका इत्यादि कितीतरी गोष्टी तयार होत आहेत बनत नाही फक्त अेक गोष्ट ती म्हणजे 'अेखाद्या विचाराने भारलेला समुदाय' गावामध्ये विकासाची काम थोडी फार ठिकठिकाणी होतच आहेत गावचा 'खास समुदाय' मात्र तयार होत नाही सरकार किंवा सेवा सस्थामार्फत जी काही काम होत आहेत त्याचा लाभ अशाच थोड्या लोकाना होत आहे

की तो करून घेण्याची ज्याच्यात कला किंवा शक्ति आहे बाकी सर्व लोक विकासाच्या मर्यादेच्या बाहेर आहेत. दगडूभाऊ हें सर्व आपल्या डोळ्यानी पाहत आहे हरिभाऊ भोगत आहे गावात शिवाजीरावसारखे फार थोडे लोक आहेत शभरातील अंशीपेक्षा जास्त लोक दगडूभाऊसारखे आहेत. गावातील शेकडा अंशी लोक वंचित राहतील आणि गावाचा विकास होत राहील हे कसे शक्य आहे ? जे लोक ग्रामविकासाच्या बाता मारतात त्यानी या गोष्टीचा विचार करावा कीं सामुदायिकभावनेचा विकास होण्याच्या मार्गात ज्या अडचणी आहेत त्या दूर केल्यानंतर ग्राम-विकास होईल की विकासासाठी साप्रतच्या विस्कळीत गावानाच केवळ 'समुदाय' मानल्याने विकास होईल ?

स्वराज्यप्राप्तीनतर विविध प्रकारच्या ज्या सरकारी योजना झाल्या, त्यामुळे जनतेच्या मनात जो आकाक्षा जागृत झाली ती अद्याप सर्वांची पूर्ण झाली नाही. ज्या कोणाची पूर्ण झाली त्याची दमन व शोषण शक्ति वाढली. ज्याची पूर्ण झाली नाही ते क्षुब्ध झाले व तोड आवट करून अलग झाले. त्याच्यामधे ईर्षा, स्पर्धा, आणि विरोध याची एक जबरदस्त भिंत उभी झाली. या भिंतीला निवडणुकींनी लोकशाहीचें मोठे आकर्षक नाव देऊन पक्के केले पचायतीपासून तो ससदेपर्यंतच्या सदा बहरलेल्या निवडणुकीनी अधिकाराची व सत्तेची जी तृष्णा निर्माण केली तीमूळे आपल्या विजया-साठी लोकानी जाती, वर्ग, धर्म, पक्ष, परिवार इत्यादि विविध प्रकारच्या सकीर्ण घोषणाचा आधार घेतला आणि गावामधे जो थोडा फार आपुल-कीचा भाव उरला होता तोहि छिन्न-भिन्न करून टाकला आज गावामधे केवळ सत्ता आणि सपत्ति याचा नगा नाच पाहायला मिळत आहे या नाचात कोणी स्वत: होऊन दाखल होवो अथवा न होवो, पण प्रत्येकाचें मन दरवेळीं ईर्षा, द्वेष, प्रतिस्पर्धा आणि सूड या भावनानी नेहमी भरलेले असतें यातून मुक्त होऊन गावचे लोक केंव्हाहि सपूर्ण गावाच्या सामुदायिक हिताच्या गोष्टीचा विचारच करू शकत नाहीत

अशा परिस्थितीत आम्ही 'विकास' कशाला म्हणावा ? आम्ही कसे समजावें की विकास होत आहे ? विकासाची कसोटी आम्ही कोणती

मानावी ? समाजाच्या वरच्या थरातील काही थोडचा लोकांची स्थिति पाहून की खालच्या थरातील अगदी शेवटच्या माणसाची स्थिति पाहून ? आज विज्ञानाने इतकी सुखाची साधने उपलब्ध करून दिली आहेत, आणि लोकशाहीने प्रत्येकाला समान-मताधिकार दिला आहे, अशा वेळी तर अंतिम व्यक्तीची स्थिति पाहिल्याशिवाय विकासाची कोणती कसोटी ठरू शकते ? बाहेरची कामें आज जीं विकास म्हणून मानलीं जातात तसली कामें इंग्रजाच्या वेळेला काही कमी नाही झालीत पण इंग्रजानी देशाचा विकास केला असे आम्ही कधी मानले नाहीं. लोकशाही आणि समाजवादाची घोषणा केल्यानंतर केवळ सरासरीचे आकडे मोजीत राहिल्याने आता काम भागणार नाही अंतिम व्यक्तीचा मापदंड मानल्याशिवाय आता गत्यंतर नाही देशाचा विकास आतापर्यंत काही थोडचा मोजक्या लोकांपर्यंतच पोहोचला आहे. शेवटचा माणूस तर पहिल्यापेक्षाहि अधिक मागे फेकला गेला आहे दगडुभाऊ व त्या भंगी युवकाची गणना अंतिम माणसामधें आहे. शेती, लहान-लहान उद्योगधंदे आणि रोजमजुरी यामध्ये गुंतलेल्या कोटयावधि उत्पादकांची त्याचेच सारखीच परिस्थिति झाली आहे. जे आपले श्रम विकून जीवतात काम करतात, गुरे राखतात, माती खोदतात, सफाई करतात, लहान लहान उद्योग चालवतात अशा उत्पादकांना रोजमजुरी व इभ्रत या स्वरूपात विकास देवतेचा किती प्रसाद मिळाला आहे?

आतापर्यंत विकास असा विश्वास निर्माण करू शकला नाही की उत्पादकालासुद्धा ईमानदारीची भाकरी व प्रतिष्ठेचें जीवन मिळू शकतें ! जर असे झाले असते की विकास वरच्या थरापासून सुरू होऊन हलके हलके खालच्या थरापर्यंत पोहोचत आहे व सुखाच्या आशेचा किरण दिसत आहे तर शतकानुशतकें ज्यानी कष्टात काढली ते निराश झाले नसते. पण हें पाहत आहेत की विकास, खालचा रस खेचून वर नेत आहे. खाली भूक वाढते आहे तर वर भोग वाढून राहिला आहे. एकच भूमि आणि एकच सूर्य, एकच भगवान आणि एकच सरकार,पण एक कुठे आणि दुसरा कुठे ! ! जर डोळ्यासमोर असे दृश्य असेल तर कोटयावधि लोकांच्या मनाला सांत्वना कशी मिळणार आणि त्यांच्यात पुरुषार्थाची शक्ति कशी येणार ?

गावात जी शेती पिकते तिच्यात खरे काम मजूर करतो. त्या मजुराची मेहनत, मालकाच्या हातात विकली गेली आहे – मजुराच्या स्वखुशीने नाही, मालकाच्या मर्जीने आणि समाजाच्या व्यवस्थेने, आणि तेहि अशा मूल्यावर विकली गेली की तें ठरविण्यात स्वत मजुराचा काही-हि हात नाही मालकाने कर्जाने, कायद्याने, आपल्या दडुक्याने आणि समाजाच्या मान्यतेने मजुराला बाधून ठेवले आहे. पूर्वीवर चालत आलेली पद्धत हीच आहे. यात दोष कोणाचा काही नाही. मजूर आपली मेहनत न विकील तर काय करील ? त्याला याशिवाय दुसरा मार्ग कोणता ? केवळ आपल्या पोटाकरताच नव्हे तर आज देशाच्या उत्पादन वाढीच्या दृष्टीने-सुद्धा हे आवश्यक आहे की मजुराने आपले शोषण होऊ द्यावे. शोषण-मुक्त शेतीच्या अेखाद्या पद्धतीचा विचार केला आहे ? त्याचप्रमाणे सावकार व्याज वट्टयावर आपली पुजी अेकत्रिक करीत आहेत, ती त्याची पुजी नसेल तर गावाचें कामच चालणार नाही आम्ही त्याला वाटेल तितकी नावे ठेवो, तरी आज तो गावचा फार मोठा आधार आहे. गेल्या काही वर्षांपासून सहकारी पत-पेढया पुष्कळ झाल्या आहेत पण त्याच्याकडून कित्ती जणाना मदत मिळत आहे ? लोक म्हणतात व्यापारी फसवतात, पण जर व्यापारी गावागावातून आवश्यक सामान पोहोचतें करणार नाहीत तर दुसरा कोण पोहोचतें करणार ? शोषण करणारा मालक, व्याजवट्टे-वाला सावकार, फसवणारा व्यापारी आणि आपल्या स्वतःला विकणारा मजूर हेच चार जण आहेत की जे गावाचें जीवन चालवीत आहेत.

आजच्या समाजाजवळ शोषण करणान्या मालकाशिवाय दुसरा कोणता विकल्प किंवा पर्याय आहे ? व्याजखाऊ सावकार, फसवणारा व्यापारी आणि मेहनत विकणारा मजूर याना पर्याय काय ? कोणी या पर्याय व विकल्पाबद्दल विचार केला आहे काय ? हें समजनीय आहे काय की हे चारीजण आपआपल्या जागीं आहेत तसेच राहावेत आणि गावचा विकास व्हावा ? कित्येक वेळा तर मालक, सावकार आणि व्यापारी अेकच व्यक्ति असते, आणि मग तो आपल्या त्रिविध शक्तीने सगळ्या गावावर आपला अधिकार जमवतो.

आज संपूर्ण ग्रामीण क्षेत्रात अेक विचित्र प्रकारची धावपळ माजली आहे. मालक, सावकार व व्यापारी हे तिघे विकास आणि योजना याचा जास्तीत जास्त लाभ हस्तगत करू चाहत आहेत. या खटपटीत ते स्वतः कधी अेखाद्या पक्षात दाखल होऊन जातात, अेखाद्या पुढाऱ्याशी दोस्ती जमवून ठेवतात, किंवा सरकारी अधिकाऱ्याला भागीदार बनवून टाकतात. अशा रीतीने या सर्वांचे अेक प्रकारचे बंधु-भावात्मक नाते निर्माण होते, हितसंबंध प्रस्थापित होतात आणि त्याच्या मार्फत मग उघडपणे सत्ता आणि संपत्तीचा खेळ खेळला जातो हा सर्व खेळ वरच्या काही थोडया लोकांचा असतो. बाकी सर्व लोक फक्त तमाशा पाहणारे असतात. मालक, सावकार आणि व्यापारी कधी आपसात मिळून, कधी अेखाद्याला हटवून, पंचायत, शाळा, सहकारी संघ यासारख्या संस्था आपल्या हातात ठेवून घेतात, अशासाठी की स्वार्थ साधण्याची कोणतीहि संधि हातातून निसटून जाऊ नये. सत्तेपासून संपत्ति आणि संपत्तीपासून सत्ता... सार्वजनिक जीवनाचा बस हाच ढंग बनून गेला आहे. यासाठीच सारी धावपळ होत असते. कोणत्याहि गावात हें दिसून येत नाही की मालक, सावकार, मजूर किंवा आणखी कोणी का असेना सर्व अेकत्र मिळून आपल्या गावासाठी अेक सम्मिलित योजना तयार करीत आहेत आणि सर्व मिळून तिच्यात काम करीत आहेत.

आपसातील विरोध आणि संघर्ष मिटून जातील तेव्हाच मेळ-अेकोपा होईल, तेव्हाच गाव अेक-समुदाय बनेल, आणि त्यात ही भावना निर्माण होईल की "हा गाव आमचा आहे, व आम्ही याला तयार करू" अशी ग्राम-भावना अद्याप निर्माण झालेली नाही. पण आश्चर्य हें आहे की या ग्राम-भावनेची आवश्यकता मान्य करूनसुद्धा, ज्या कारणामुळे ती बनू शकत नाही त्या कारणांचा आम्ही शोध करीत नाही, आणि त्या कारणाचा शोध लागला तरी ती दूर करण्याच्या दिशेने आम्ही पावले टाकत नाही. म्हणून ज्या जनतेच्या विकासाच्या नावावर कोटयावधि रुपये खर्च होत आहेत ती जनताच स्वतः समजत नाही की विकासाची गंगा कोणीकडे वाहत आहे? सरकार म्हणते, जनता सहयोग देत नाही. दगडूमाऊ विचारतो आहे "या विकासात माझें स्थान कोठे आहे?"

# विकासाची त्रिवेणी

: ३ :

एखाद्या विकास-खडाच्या कार्यालयात एक्सारखे दोनचार दिवस जाऊन पाहा काही करायचे नाही, फक्त तेथे काय होत आहे त पाहायचे. तेथे तुम्हाला मुखडाची गर्दी दिसेल, ठेकेदाराची गर्दी दिसेल, पुढारी दिसतील प्रत्येकास आपआपल्या ढगाप्रमाणे विकासात रुचि आहे एके दिवशी मुखड असणारे एक मान्यवर मित्र विकास खडातून परत येत होते रस्त्यात भेटले, मी विचारले "महिन्यातून किती दिवस आपण विकास-खडात जात असता ?" उत्तर मिळाले – "कमीत कमी वीस दिवस" "इतके दिवस काय काम असतें ?" मी फिरून विचारल "आपणाला माहीत नाही, विकास-खड तीर्थराज-सगम आहे ?" त्यानी हसत हसत म्हटले "कोण कोणत्या धारा-प्रवाहाचा ?" मी जाणण्याची इच्छा केली "टोपी, थैली, खुर्चीचा" अस म्हणून मुखड हसले मी समजू शकलो नाही, विचारले – "म्हणजे ?" ते म्हणाले "टोपी पुढाऱ्याची, थैली ठेकेदाराची आणि खुर्ची अधिकाऱ्याची ही आहे विकासाची त्रिवेणी जिच्यात मी महिन्यातून वीस दिवस स्नान करीत असतो जर पुरे तीस दिवस स्नान करू शकलो असतो तर आणखीच चागले झाल असतें "

हे पुढारी गृहस्थ एक गभीर व्यक्ति आहेत लोकात मान-मान्यता आहे, गावात काही विकासाच काम व्हावे अस मन पूर्वक इच्छितात म्हणून जरूर ती धडपड करण्यात अगचोर नाहीत वरील गोष्ट त्यानी विनोदाने सागितली असली तरी त्यानी जें काही सागितले त्यावरून विकासाच्या रग-ढगाचा पुरा पत्ता लागतो हें समजायला वेळ लागत नाही की गावातील चार दोन चतुर माणसं सोडून बाकीचे लोक विकासाच्या कामापासून अलग का राहतात ? खरे पाहू जाता त्याना त्याबाबतीत रुचि तरी का वाटावी ? काही वर्षापासून चालत असलेल्या एका विकास-खडाच्याबाबतीत १९६४ साली चर्चा चालली की एक एप्रिलपासून तो बद होणार आहे कारण सरकारी योजनेप्रमाणे त्याचे काम व कालावधि

पूर्ण झाले होते त्या दिवसात मी त्या विभागातील खेड्यात फिरत होतो एक नाही अनेक सभामधून मी विचारले – "तुमचा विकास-खड बद आहे त्याचे काम पूर्ण झाले आह तुम्हाला कसे काय वाटत ?" सर्व ठिकाणीं जवळ जवळ हेच उत्तर मिळाले – "ज्याच्या राहण्यात खुशी नाही त्याच्या जाण्यात खेद कसला ? खेद त्याना होईल ज्याचे खिसे भरत होते आम्हाला काय ?" ज्या विकास-खडाने वर्षानुवर्षे काम केले, लाखो रुपये खर्च केले, त्याबद्दल लोकाचा असा भाव का ? खरोखर का तेथे काहीच काम झाले नाही ? सरकारी अधिकाऱ्यामधे काहीएक करण्याची भावनाच नाही काय ? काय लोक इतके स्वार्थी व कृतघ्न आहेत की ते कोणाचे उपकारच मानीत नाहीत ? प्रत्येक बाबतीत थोडेफार तथ्य असू शकेल पण मुळात गोष्ट काही निराळीच आहे

ही गोष्ट खरी की विकासाने साधन दिलीत, रुपये वाटले, कित्येक प्रकारच्या सस्था उभ्या केल्या, पण यापेक्षाहि जास्त खरी गोष्ट ही आह की त्याच्या योजनेने सबसामान्य लोकाच्या जीवनाला स्पर्श केला नाही गाववाल्याची ही तक्रार खरी आहे की जें काही मिळाले ते जे समर्थ होते, धावपळ करू शकत होते, वारवार विकासाच्या त्रिवेणीमधे डुबू शकत होते व घेण्या-देण्याचा सौदा पटवू शकत होते, त्या लोकाच्या पोटात सामावून गेले अशा परिस्थितीत गावातील दगडूभाऊसारख्या सामान्य माणसाला कसे वाटाव की त्यालाहि विकासाचा प्रसाद मिळतो आहे ? ज्या देशात शभरापैकी साठापेक्षा जास्त लोक अन्न-वस्त्र घराबाबत भिकारडे, लाजीरवाणे जीवन व्यतीत करीत आहत, त्या ठिकाणचे लोक अन्न वस्त्राशिवाय दुसरी कोणती भाषा समजू शकतील ? गाववाला पाहतो आहे की ज्याच्याजवळ पुष्कळ शेती आह, नागरवेल आहेत, बैलेवर सामान आणण्यासाठी व मजूर लावण्यासाठी पैसा आहे त्या थोड्या लोकाची शेती, चांगले बी किंवा रासायनिक खत व वलित यामुळे चागली झाली आहे, पण जो भूमिहीन आहे मक्त्यान शेत करतो, ज्याच्याजवळ थोडी किंवा अगदी लहान शेती आहे, जे साधन जुळवू शकत नाहीत, जे कर्जा-खाली दबले आहेत त्याच्या शेतीच काय झाले ? जो कारागीर आहे व

आपल्या थोड्याशा पुंजीवर खेळणी बनवतो आहे, जोडे बनवतो आहे, भात (धान) कांडतो आहे, तेल पिळतो आहे किंवा गूळ तयार करतो आहे, त्याची काय स्थिति झाली आहे? जमीनवाले, हुन्नरवाले, पुंजीवाले, जे विकासाच्या वेळीं साधनें घेऊन त्यापासून फायदा काढू शकत होते त्यांना फायदा मिळाला आहे, पण लहान माणसाला हें दिसतें आहे की मोठ्या माणसाला जो फायदा मिळाला त्यामुळे त्याची दमन व शोषण करण्याची शक्ति पूर्वीपेक्षा अधिकच वाढली आहे. आणि या वाढलेल्या शक्तीचा आघात लहान माणसावर पडतो आहे.

लहान माणूस, विशेषें करून शेतातील मजूर, कारागीर, लहान शेतकरी आज पूर्वीपेक्षा अधिक दरिद्री झाला आहे. पीक झालें नाही किंवा बाजारात धान्याचे व आवश्यक वस्तूंचे भाव वाढले तर त्याचा बैल विकायला निघतो, घरातील भांडीकुंडी विकली जातात आणि अधिक व्याजाच्या दरावर कर्ज काढण्याची त्याच्यावर पाळी येते. तो विचार करतो की विकासाने त्याला कोणते रक्षण मिळाले? हा कसला विकास कीं ज्यामुळे सर्व काही वाढतें पण पोटाचें अन्न वाढत नाही, अंगाचा कपडा वाढत नाही, रोजी मिळेल असे कामाचे दिवस वाढत नाहीत, संकटात मदत मिळत नाही? मालकाची मालकी वाढते, सावकाराचें व्याज वाढतें त्याच बरोबरच मजुराचें दारिद्र्यहि वाढत गेलें तर तो विकास काय कामाचा? आराम तर मिळाला नाहीच, उलट गावात चारडाकूंची भीति वाढली, आपसातले झगडे वाढले व अशांति वाढली याशिवाय सामान्य माणूस विकासाचें दुसरें कोणतें चित्र पाहतो आहे? म्हणून त्याच्यावर सडका, शाळा, दवाखाने, पंचायत-घरें, पुढाऱ्यांचीं भाषणें किंवा विकास खात्याची धूमधाम याचा काहीहि परिणाम होत नाही

स्वराज्य मिळाल्यानंतर सरकारने जेव्हा गावाच्या विकासाकडे लक्ष दिलें तेव्हा त्यांनी तीन ग्रामीण संस्था खूप महत्त्वाच्या मानल्या — शाळा, ग्रामपंचायत व सहकारी समिति. विचार केला, शाळेत साक्षर सरकारीचा काम होईल, ग्रामपंचायतीनें लोकशाहीचें संघटन होईल व सहकारी-समिति ग्राम-उद्योग ग्रामीण आर्थिक परत घेऊन येईल. हें खरें की समाजाच्या

विकासात या सस्थाना फार मोठें स्थान आहे आणि म्हणूनच त्याना प्रोत्साहन देण्याचें धोरणसुद्धा सरकारने स्वीकारलें पण याचा परिणाम असा झाला की जिथे पाहाल तिथे कोणत्या ना कोणत्या सस्थेच्या नांवाची पाटी टागली आहे आणि सरकारी मदत घेतली जाऊ लागली आहे सस्थान बनविणे हें विकासाचें मुख्य काम मानलें जाऊ लागलें

बी डी आ च्या ऑफिसात जे लोक दिसतात ते बहुधा कोणत्या तरी सस्थेचेच असतात कित्येक वेळा तर एकच मनुष्य अनेक सस्थाशीं जोडलेला असतो बहुधा गावात असे दिसून येते की जे लोक ग्रामपचायतीत सरपच व पच आहेत तेच शाळेच्या प्रबध समितीचेहि सदस्य आहेत व तेच सहकारीसमितीचे डायरेक्टरसुद्धा आहेत आजकाल सार्वजनिक जीवनाचा असा एक ढग होऊन गेला आहे की जास्तीत जास्त सस्था आपल्या हातात राखाव्यात म्हणजे त्या सस्थाची साधने व सोयी याच्याद्वारे आपला व्यक्तिगत स्वार्थ साधला जाऊ शकेल आणि त्याच्या प्रतिष्ठेमुळे आपला प्रभाव वाढवला जाऊ शकेल

एवढयासाठीच लोक कोणत्या ना कोणत्या रुपाने सरकारचा एखादा विभाग किंवा एखादी सस्था याच्याशी जोडलेले राहू इच्छितात, म्हणजे त्याच्या आधाराने पुढें सरकण्यास मदत मिळू शकेल सामान्य नागरिक या नात्याने जो मनुष्य शून्य असतो तोच एखाद्या सस्थेचा सदस्य किंवा सचालक बनून एक खास प्रतिष्ठित व्यक्ति बनून जातो, त्यामुळे त्याची इज्जत वाढते आणि जें काम दुसऱ्या कोणाला दु साध्य होते त या माणसाला सुसाध्य होऊन जाते विकासाच्या नावाने सरकारने जेवढा पैसा आणि साधन गावामध्ये दिलीं आहेत ती सर्व या खास व्यक्तींच्या हाती किंवा सस्थाच्या हातो लागली आहेत हाच विचार करून लोकानी धडाधड सस्था बनविल्या आहेत -- काही सरकारने स्वत बनविल्या आहेत, काही प्रोत्साहन देऊन बनविल्या आहेत ग्रामपचायत ही सरकारच्या कायद्याने बनलेली सस्था आहे, तर शाळा व सहकारी समित्या ह्या सरकारच्या मदतीने बनलेल्या आहेत सरकारला वाटलें होतें की या सस्थामार्फत आपलें कल्याणकारी काम गावोगावीं फैलावले जाईल पण खरोखर घडले

आहे असे की योजना आणि साघने वरच्यावर राहून गेली व परिणाम असा झाला की ज्या लोकांना सर्वात अधिक जरूर होती त्याच्यापर्यंत काहीहि पोहोचलेच नाही

आज गावोगाव जी आपमानील स्पर्धा, प्रतिस्पर्धा व गटबंदी दिसते आहे ती पुष्कळशी सस्थाच्यावर कब्जा करण्यासाठी होत असते ग्राम-पचायत आपल्या हातात राहावी, शाळेत आपला बोलवाला असावा, पचायत समिति, सहकारी समित्या यात आपले बहुमत असाव किंवा आपल्या पक्षातील अधिकाराच्या जास्तीत जास्त जागा आपल्या किंवा आपल्या गटातील लोकाच्या हातात राहाव्यात – बस रात्रंदिवस काही लोक बुद्धि-बळाचा हाच खेळ खेळत असनात सामान्य माणसाला या खेळात काम स्थान आहे ? ज्याच्याजवळ पैसा आहे, पत आहे, फुरसत आहे, किंवा जो जाति किंवा जनसेवा याच्या लब्याचवडया बाता ठोकून आपल्याकडे लोकांना कम वळवावे हें जाणतो अशा लोकाच्यासाठी हा तमाशा आहे हे त्याला माहीत आहे

सस्थावर अधिकार जमविण्याचा प्रश्नच सध्या गांवातील संघर्ष व तणाव याचे मोठें कारण होऊन बसला आहे हा प्रश्न दृष्टीसमोर ठेवूनच पक्ष बनविले जातात, निवडणुका लढविल्या जातात, झगडे उभे केले जातात आणि फौजदारी खटलेहि केले जातात याचा परिणाम असा झाला आहे की गावचे लोक एकत्र येऊन सर्वांच्या कल्याणाचे एखादें काम उभें करावे असा तह्हेच वातावरणच तयार होऊ शकत नाही गावातील मुख्य लोक, समजदार लोक, सर्वजण आपसातील झगडयात गुतलेले असतात आणि ल्हान गरीब लोकांनाहि या भानगडीत खेचीत असतात अगदी खालच्या थरातील लोकानी मानूनच घेतलेलें असते की माठ्याचे जगच निराळें आहे, त्यात आपल्याला स्थान नाही त्याना गरीबीमुळे व रोजी मिळविण्याच्या कामामुळे फालतु गाष्टीत डोके खुपसायला फुरसत आहे कुठे ?

लोकशाहीच्या नावाने शाळा उघडण्यात आल्या आहेत, व सहकारी-तेच्या नावावर सहकारी-समित्या बनविल्या गेल्या आहेत, पण परिणाम मात्र उलटा झाला

प्राय असे म्हटले जाते की सरकार आपल्या बाजूने (लोककल्याणासाठी) सर्व काही करीत आहे पण गावचे लोक आपली जवाबदारी काही ओळखत नाहीत, मिळून-मिसळून काम करीत नाहीत. ते स्वार्थी आहेत, आळशी आहेत म्हणून पैसा खर्च होतो तरी काम होत नाही. काय खरोखर एवढीच बाब आहे ? जरा खोल विचार करण्याची आवश्यकता आहे काय कारण आहे की नवी साधने व नव्या सस्था याच्याकडून विकासाची आमची आशा पूर्ण झाली नाही ? एवढे मात्र निश्चित आहे की गावातील लोकाचे आपआपसातील सबध जोपर्यंत सुधारत नाहीत, लोकानी मिळून मिसळून विचार करण्याचे आणि एकत्र काम करण्याचे वातावरण जोपर्यंत तयार होत नाही तोपर्यंत विकासाबद्दल कोण काय सागणार ! एवढेच नव्हे, चालू परिस्थिति तशीच राहिली तर गावातील उरले-सुरलेले आपसातील जीवन छिन्न-भिन्न होऊन जाईल आणि ही साधने आणि या सस्था तिळमात्र कामाला येणार नाहीत. मुख्य प्रश्न परस्पर सबधाचा आहे सबध सुधारले तर साधने काही दिवस भले जुनीं राहोत, सस्था वनोत अथवा न वनोत गावाची हवा बदलून जाईल आणि आपल्या सामूहिक शक्तीच्या जोराबर गाव आपल्या समस्या वशा सोडवायच्या हे शिकून घेईल

• •

# अंतःकरणांना जोडणें

## : ४ :

जरा खोल दृष्टीने तपास केला असता आम्हाला गाव या वर्गात विभागलेले आहे असे दिसून येईल —

क — आर्थिक दृष्टीने तीन वर्ग

(१) अधिक जमीनवाले, जे स्वत काम करीत नाहीत

(२) थोडी जमीनवाले जे स्वत भरपूर काम करतात.

(३) भूमिहीन मजूर जे आपले श्रम विकून पोट भरतात.

या तिघांचा आपआपसात मयकर विरोध आहे व वरच्या वर्गाचा खालच्या वर्गाशी शोषक व शोषित असा संबंध आहे

ख — सामाजिक दृष्टीने वर्ग

(१) सवर्ण हिंदु, मागासलेले हिंदु अस्पृश्य हिंदु

(२) हिंदु आणि मुसलमान किंवा अन्य

हे आपआपल्या रीति रिवाजांना अनुसरून एकमेकाहून अलग आप आपल्या मर्यादित वर्तुळात राहतात

ग — सांस्कृतिक दृष्टीने

(१) वरची जात आणि खालची जात

(२) श्रम विकणारे आणि श्रम टाळणारे

याचे संस्कार विचार करण्याच्या पद्धति, अनुभव, आकांक्षा, आशा सर्व काही भिन्न आहेत

पन्नास कोस दूर असलेला आमचा एखादा नातलग आजारी झाला तर आम्हाला चिंता वाटते आम्ही त्याला भेटायला जातो, सर्व प्रकारची त्याला मदत करतो, पण आमचा शेजारी आजारी पडला तरी आम्हाला त्याचा पत्तासुद्धा नसतो उलट कित्येकदा तर ईर्षेमुळे किंवा द्वेषभावनेमुळे मनातल्या मनात गुप्त खुशीसुद्धा होते—आणि आजारीपणाच्या खुशीपेक्षा मरणाची खुशी जास्त होते. पोलिसांशी संगनमत करून मुकदम्यात अडकवणे, एखादा होऊ घातलेल्या कामात बिघाड करणे, अडचणीत

सापडलेल्या इसमाकडून जास्त व्याजावर रुपये देऊन जमीन लिहून घेणे, भावाभावात झगडे लावणे, कर्ज देऊन मजुराला अशा रीतीने फसवून टाकायचे की त्याला आपल्या कामावर येणे भाग पडावे, निवडणुकीत नाते-संबंध, जाति व धर्म या नावाने आवाहन करून लोकांना आपल्याला अनुकूल करून घेणे, किंवा दमडया, दङ्का व दारू याचा उपयोग करणे, इत्यादि युक्त्या-प्रयुक्त्यांचा उपयोग खुल्लखुल्ला होत आहे आणि दिवसेंदिवस वाढत आहे. गावातील बुद्धिमानांची बुद्धि अधिकतर अशाच कामात लागलेली असते.

असे किती लोक आहेत की जे आपल्या गावातील एखाद्या समस्ये-बाबत विचार करीत आहेत ? फार थोडी गावे राहिली आहेत की ज्यामधे अशी एक-दोन सज्जन माणसे वाचली असतील की ज्यांच्या प्रामाणिकपणा-वर व सज्जनतेवर संपूर्ण गावाचा विश्वास आहे. ज्याप्रमाणे भला माणूस राजकारणापासून मागे हटून राहिला आहे त्याचप्रमाणे गावातील खरीखुरी भली माणसेमुद्धा गावकामापासून अलग होऊन राहिली आहेत. ज्या ठिकाणी दुसऱ्याच्या अडचणींना, संकटांना आपली (स्वार्थाची) संधि बनविण्याची कला विकसित केली जात आहे, त्या ठिकाणी सज्जनतेसाठी जागा आहे कोठे ? एखादा पुढारी, शिक्षक किंवा दुसरा कोणी मनुष्य सेवा अगर गावाच्या भलाईबाबत मनात विचार जर करीत असला तर त्याला सरकारी कचेरीपासून तो थेट गावापर्यंत इतके प्रतिकूल वातावरण आढळून येते की तो हिंमत हरून बसतो किंवा आवट तोड करून शेवटी त्याच सर्व गोष्टी करू लागतो ज्या दुसरे लोक करीत असतात.

गावात जे जुने तणाव व संघर्ष होते ते तर कायमच होते, पण त्याच्या जोडीला ग्रामपंचायती, शाळा, सहकारी-संस्था, राजकीय पक्ष आणि निवडणुकी यांच्यामुळे नित्य नवे-नवे तणाव व संघर्ष निर्माण होत आहेत आणि एकमेकांमधल्या भिंती पूर्वीपेक्षा जास्त उंच-उंच होत चालल्या आहेत. म्हणून एकूण सर्व मिळून ही गोष्ट स्पष्ट झाली आहे की जोपर्यंत आपआपसातील संबंधामधे सुधारणा होत नाही तोपर्यंत गावात विकासाला अनुकूल वातावरण बनू शकत नाही. ग्रामीण जीवनात वैमनस्याचे विष

इतके खोल गेले आहे की तें काढून टाकण्यासाठी ग्राम-शरीराची आंतून सफाई करावी लागेल, ग्रामीण-जीवनाच्या विणण्याचा सारा ताणा-बाणा पार बदलून टाकावा लागेल

आमच्या देशातील ग्रामीण-समाजाच्या रचनेमधे एक विशेष गोष्ट आहे तिच्याकडे आम्हा लोकांचे लक्ष जाणे आवश्यक आहे गोष्ट नवीन नाही, खूप जुनीच आहे अगदीं जुन्या काळापासून जमिनीचे मालक वरच्या जातीचे लोक आहेत आणि खालच्या जातीचे लोक या मालकाच्या जमिनी मक्त्या-बटाईने घेऊन वाहतात, किंवा त्याचे शेत-मजूर म्हणून जगतात मालक-मजूर नाते ग्राम जीवनाची गंगा आहे आणि उच्च-नीच नाते यमुना आहे सगमावर ज्याप्रमाणे दोन्ही प्रवाह एकत्र होउन अभिन्न होतात त्याचप्रमाणे आजच्या गावात एक नाते दुसऱ्या नात्यापासून अलग करणे कठिण आहे मालक स्वत शेती करीत नाही हाताने काम न करण्याचा सरजामशाही काळापासून चालत आलेला हा सस्कार अद्याप पूर्णपणे आहे तसाच आहे याचा परिणाम असा झाला आहे की सर्व शेती, मजुराच्या भरवशावर चालते आणि गेल्या हजार वर्षापेक्षाहि अधिक काळात शेतीची पद्धति व साधने याचा विकास बहुधा न झाल्यासारखाच आहे

अशा परिस्थितीत शेतीसाठी जर मजुराच्या भरवशावरच राहावयाचे आहे तर मग त्याला वाटेल त्या उपायाने अशा परिस्थितीत ठेवायला पाहिजे की तो मालकाच्या शेतावरच काम करीत राहील, मालकाला सोडून कोठे जाऊ शकणार नाही इकडे साप्रतच्या जमान्यात खेड्यातले मजूर फार मोठ्या सख्येने शहरात निघून गेले आहेत आणि एकसारखे जात आहेत म्हणून मालकांमार्फत आणखीहि जास्त प्रयत्न होत आहेत की मजुराना कशातरी रीतीने समजावून किंवा कोठेतरी अडकवून, रोकून ठेवले जावे आणि यासाठी कायदा, कर्ज, दडुका यासारख्या ज्या काही बाबींचा उपयोग होऊ शकतो तो केला जात आहे. याहून निराळा हामुद्धा उपाय होऊ शकला असता की शेतीची उन्नति झाली असती, उत्पन्न वाढले असते, आणि मजुराना अधिक मजुरी मिळाली असती तर मालक व मजूर खुशीने शेतीबरोबर जोडले गेले असते. मग ही जरी भांडवलदारी

पद्धति झाली असती आणि त्यात मजुराचे शोषण जरी झाले असते, तरीपण कमीत कमी एवढे झाले असत की मजुराना चागली मजुरी मिळाली असती पण तसे घडले नाही.

गावामध्ये शेती हा धदा असा झाला आहे की त्यात बुद्धिवाला आपली बुद्धि घालू इच्छित नाही, भाडवलवाला आपले भाडवल घालू इच्छित नाही गावातला जो तरुण लिहिणे वाचण शिकतो तो शहरात काम शोधत असतो, ज्याच्याजवळ काही पैसा जमा होतो तो शहरात जाऊन घरे बाधतो किंवा दुसऱ्या एखाद्या धद्यात पैसा गुतवतो मजुराचासुद्धा हाच प्रयत्न असतो की गावातील दमनाच्या व शोषणाच्या जीवनातून कशीतरी सुटका व्हावी. गावात रोजचे काम मिळत नाही, चागली मजुरी मिळत नाही, माणुसकीची वागणूक मिळत नाही तो शहरात रिक्शा चालविणे पसत करतो व गावातील घरदार सोडून देशाच्या एखाद्या कोना-कोपऱ्यात आपल्या मुलाबाळाना घेऊन निघून जातो गावात तो तेव्हाच राहातो जेव्हा त्याची स्वत ची काही शेती असते किंवा अगदी लाचारीने त्याला गावात राहाणे भाग पडते

गावातून बुद्धि गेली, भाडवल गेले, श्रम गेले म्हणजे सरस्वती, लक्ष्मी, शक्ति तिन्ही निघून गेल्या तर मग तेथे काय राहिले? मग तेथे कशाच्या आधारावर विकास होणार? आणखी मग जे गावात राहातात त्याना तरी आपल्या कामात किती आस्था राहाणार व ते काम तरी किती मेहनतीने करतील? शिवाजीरावाची शेते अशी चागली आहेत कीं एका एकरात पचवीस-पचवीस मण गहू होऊ शकतो पण प्रत्यक्ष होतो किती? दहा मणसुद्धा होत नाही होईल कसा? दगडुभाऊ व त्याच्याबरोबर काम करणाऱ्या मजुराना काय गरज पडली आहे की त्यानी शिवाजीरावाच्या शेतातील उत्पन्न वाढवावे? त्याच्या मनात साहजिकच येते कीं मालकाचे उत्पन्न वाढल्याने आपल्या मजुरीत काही वाढ होणार आहे काय? जर मजुरी वाढणार नसेल तर उत्पन्न कशाला वाढवावे? आपले काम टिकून राहील, आपल्याला सुट्टी मिळणार नाही, बस, तेवढेंच काम करावे!

शेत मालकाच आहे म्हणून त्याच मन त्यात आहे, पण शेतीमध्ये त्याचा हात नाही हात लागता मजुराचा, पण त्याचें शेतात मन नाही मन कोणाचें आणि हात कोणाचा ? अशा रीतीने कोणतहि काम कसे चागलें होऊ शकेल ? आणि जोपर्यंत शिवाजीरावासारखे मालक आहेत व दगडुभाऊसारखे मजूर आहेत तोपर्यंत मनाचा आणि हाताचा मेळ तरी कसा होऊ शकेल ? याचा पुरवा मला अेक दिवस मिळाला उन्हाळया-मध्ये अेके दिवशी तिसऱ्या प्रहरी दान आदिवासी धट्टेकट्टे तरुण अचानक-पणे माझ्या खालीत आले आणि म्हणाले "साहेब, आम्ही अैकले आहे की आता अधिक भात (धान) पिकविण्याची काही नवी युक्ति निघाली आहे आम्हा लोकानामुद्धा ती माहीत होऊ शकेल काय ?

मी म्हटले 'भात-शेतीची तुम्हाला माहिती नाही ?' ते म्हणाले "माहीत आहे पण हल्ली आम्ही मालकाच्या शेतावर काम करीत असतो"

'तर काय मालकाने तुम्हाला पाठविले आहे ?'

"नाही आम्हाला भूदानात थोडी जमीन मिळाली आहे आमची इच्छा आहे की त्यात जास्तीत जास्त उत्पन्न व्हावं मालकाच्या शेतात उत्पन्न वाढविण्याची चिंता आम्ही का करावी ? त्याच्याकडे जास्त भात पिकल तर मजुरीत आम्हाला जास्त भात मिळेल काय ?'

अशा तऱ्हेच्या गाष्टी त्या वनवासी युवकानी केल्या ते युवक म्हणजे अगदी निरक्षर, त्याचा बाहेरच्या जगाशी काही सपर्क नव्हता फक्त कधी कधी बाजाराला येत असत तेथेच त्यानी जपानी भातशेतीचे नाव अैकल होत त्यानी दर्शविलेली भावना काही थोडयाच मजुराच्या मनात आहे असें नाही, उलट क्वचितच असा एखादा मजूर असेल की ज्याच्या मनात मालकाच्या शेतीविषयी यापेक्षा निराळा भाव आढळून येईल तरुण मजुराच्या मनात तर नेहमीच हे विचार असतात की कस तरी करून गावातून निघून पळून जाव

एके दिवशी एका गावात सभा होती सभा सपून घरी जाता जाता दहा वाजून गेले होते नुकताच मी आडवा झालो होतो इतक्यात तीन-चार लोक आले व म्हणाले "आपल्याशी काही मागायच आहे"

"ठीक, बोला" मी म्हणालो.

"आम्ही चामारवाड्यातले लोक आहोत. आमची विनंति आहे की उद्या सूर्योदयापूर्वी आपण आमच्या वस्तीत येण्याची कृपा करावी."

मी कबूल केले. दुसऱ्या दिवशी पहाटेस आपल्या दोन सहकाऱ्यांना घेऊन मी त्यांच्या वस्तीत गेलो. खाटेवर चादरी आथरल्या होत्या. हात-पाय धुण्यासाठी चकचकीत चमकणाऱ्या लोट्यामध्ये पाणी भरून ठेवले होते. पोहोचल्याबरोबर पाय धुतले गेले. लागलीच एक-एक प्याला दूध मिळाले दूध पाहून मला आश्चर्य वाटले मी विचारले : "तुम्हा मंडळी-जवळ गाई-म्हशी आहेत ?"

"नाही." उत्तर मिळाले.

"मग हे दूध कोठून आले ?"

"काल मालकाकडून दीड रुपया कर्जात आणला होता त्यातून आपल्यासाठी दूध विकत आणले."

"असे कशाला केले ?"

उत्तर म्हणून एक युवक हसत हसत म्हणाला : "गुरुजी, एक दिवस कर्ज घेतले नसते तर काय कर्जापासून आम्हाला मुक्ति मिळाली असती ? आम्ही तर कर्जांतच जन्माला आलो आणि कर्जातच मरणार. पण आपण आमच्या घरी काय रोज येणार आहात ?" गोष्ट थट्टेत करणाला तर लागली. मग मी म्हणालो. "बरे, आम्हाला कशाला बोलावले ते सांगा."

"काही नाही, बस एवढीच प्रार्थना आहे की आम्हाला गाव सोडून जाण्याची परवानगी मिळवून द्या."

"गाव सोडून जाण्याची गोष्ट का ? आणि जर सोडून जाण्याची इच्छाच आहे तर अडचण कसली ?" मी आश्चर्याने विचारलें. त्याचे जें उत्तर मिळालें त्यानं माझ्या अंतःकरणाला धक्काच बसला. उत्तर होते. "सध्याकाळ होताच मालकाचे शिपाई आमच्या वस्तीत येऊन बसतात. मग रात्री लघवी करण्यासाठीसुद्धा बाहेर पडणे मुश्किल होते. आम्ही पोटासाठी कोठे तरी बाहेर जाऊ इच्छितो येथे पोट भरत नाही

पुरतें कामहि मिळत नाही. शिवीगाळीची व मारपिटीची गोष्ट विचारूच नका. बस, आम्हाला एवढेंच म्हणायचें आहे की मालकाला सांगा कीं आम्हाला गाव सोडून जाऊ द्या."

"कोण आहेत मालक ?" मी विचारलें

"तेच, जे काल संध्याकाळी तुमच्या सभेचे अध्यक्ष होते."

मी अवाक् झालों व गुपचुप निघून आलों. सध्या मालक-मजूर-संबंध उत्पादनवाढीच्या मार्गांत सर्वांत मोठी घोड झाली आहे. कोणाहि दहा-वीस अेकरवाल्या शेतकऱ्याला विचारा, तो सांगेल की मजुरामार्फत करविलेली शेती अेकसारखी नुकसानीची होत आहे मालकाला नुकसान येते आणि मजुराचे पोट भरत नाही हीच स्थिति पुष्कळ लोकांच्या शेतीची आहे. म्हणून लोक मक्त्या-बटाईने आपले शेत करायला देतात. कारण त्यात सर्व काही करावा लागत नाही, जें काही मिळेल तो सर्व फायदाच असतो. पण दुसरे कायद्याच्या भीतीमुळें असा प्रयत्न वाढत आहे की मक्तेदाराच्या, बटाईदाराच्या नावावर आपलें शेत लागू नये. आता तर असें दिसून येत आहे की मालक-मजुरांचे अशाप्रकारचे संबंध असेपर्यंत शेतीमध्ये कोणत्याहि प्रकारची प्रगति होणें संभवनीय नाही. शेतीच्या उन्नतीविषयींच काय, ग्रामीण जीवनात आपलेपणा, जिव्हाळा, मिळून-मिसळून काम करण्याच्या भावनेचा विकास इत्यादि गोष्टीहि होणें संभवनीय नाही ज्याअर्थी शेत आणि शेतांशी संबंध असणारे गावांतील दोन मुख्य समुदाय — मालक व मजूर — यांचा आपापसांत आतून अेवढा दुरावा आहे तर गावामध्ये कोणत्याहि सामूहिक कामासाठी अनुकूल वातावरण कसें तयार होणार ?

गरीब भरडला जात आहे. गरीवाला दिसत आहे की जीवन महाग होत चालले आहे, आपल्या मुलाबाळाची सख्या वाढते आहे, पण आपली मिळकत मात्र वाढत नाही प्रत्येक ठिकाणी तो असा जखडला गेला आहे की तो काही करूहि शक्त नाही. ही असहायता त्याला सलते आहे. तो निसटू इच्छितो, पण निसटू शकत नाही. इतर तणावाबरोबर हा तणाव-सुद्धा निवडणुकीच्या वेळीं वरच्या जातीविरुद्ध खालच्या जाति हे रूप घेऊन प्रगट होतो या मोठया तणावाबरोबर दुसरे तणावहि जोडलेले असतात. गावात मजुराची सख्या कमी झाल्यामुळे शेतीच्या हंगामात त्याच्यासाठी मोठी ओढाताण होते. म्हणून त्याना आधीपासूनच बाधून ठेवण्याचा प्रयत्न करण्यात येतो कधी कधी मालक मजुरावरून आप-आपसात झगडू लागतात. कधी सर्व मालक अेकत्र व सर्व मजूर अेकत्र मिळून दुसरे मालक व मजूर याच्या विरुद्ध गट बनवतात आणि कधी तर असेहि होते की मालकाची मर्जी सपादन करण्याच्या चढाओढीत मजूरा-मजुरातच झगडे होतात तात्पर्य असे की कुटुंब, जाति, वर्ग, समूह सर्व सर्व ठिकाणी सबधाचा तणाव निर्माण झाला आहे क्वचितच सपूर्ण गावात हार्दिक सद्भाव व सहकार याचे दर्शन होत असेल !

ज्याप्रमाणे निवडणुकामुळे तणाव फार जास्त वाढले आहेत व सघटित झाले आहेत आणि त्याना राजनैतिक उद्घोषाचे पाघरूण मिळाले आहे, त्याचप्रमाणे जमिनीबाबत जे अर्ध-कच्चे कायदे पास झाले आहेत आणि यापुढेहि आणखी पास करण्याची चर्चा चालू आहे, त्याचामुद्धा मालक, मक्तेदार-बटाईदार व मजूर याच्या आपआपसातील सबधावर फार वाईट परिणाम होत आहे सरकारने गावातील सपूर्ण जीवन डोळया-समोर ठेवून जमिनीच्या प्रश्नावर विचार केला नाही आणि वेळोवेळी निरनिराळया प्रकारचे कायदे बनविले ते दृढतापूर्वक लागू केले नाहीत. त्याचा परिणाम असा झाला की कोर्ट–कचेऱ्यातील तटे वाढले, परस्परात अविश्वास वाढला, शत्रुत्व वाढले आणि जी काही थोडी आपुलकी वाचली होती तीहि नाहीशी झाली. कोण जाणे पुढे कसा कायदा बनेल या भीती-मुळे, वाटेल त्या प्रकाराने, मालक लोक मक्तेदार कुळाच्या हातातून

जमिनी काढून घेण्यासाठी कुळाची गांवेच्या गावे (शेकडो वर्षांपासून वसलेली गावे) उजाड करण्याचा प्रयत्न करीत आहेत हेतु हा की जमिनी वाहण्याची मालकी आपल्या ताब्यात राहावी, कुळाकडे जाऊ नये.

याचे हृदयद्रावक उदाहरण गेल्या २६ जानेवारीच्याच दिवशीं प्रत्ययास आले. आम्ही काही मंडळी यवतमाळ जिल्ह्याच्या केरा तालुक्यातील काही गावावरून जात होतो ही गावे डोंगराच्या पायथ्याशी वसलेली होती. अचानकपणे आम्हा मंडळीना पाहून काही लोक आमच्याजवळ आले आणि म्हणाले : "आम्हाला जमीन पाहिजे."

"कशासाठी ?" आम्ही विचारलें.

"वसण्यासाठी."

"का बरे ? सध्या तुम्ही लोक कोठे राहता ?"

"त्या गावात."

"केव्हापासून राहता ?"

"वाडवडिलापासून."

"मग गाव सोडून कां जाता ?"

"काय करावे ? मालक म्हणताल की गाव सोडून द्या. आता आम्ही स्वत च शेती करणार आहोत "

"तुम्ही लोकांनी काय विचार केला आहे ?"

"विचार काय करणार ! मालकाची माणसे वारवार येऊन त्रास देतात. काल च सध्याकाळी आली होती काही नाही मिळाले तर घरावरच्या कौलाचाच चक्काचूर करून टाकला."

"अऽहं. गाव सोडून जाऊ नका." आम्ही मंडळींनी जोर देऊन म्हटलें.

"गाव नाही सोडावे तर काय करावे ? कोर्ट, कचेरी, पोलीस, कोठेच दाद लागत नाही. पंचायतीतसुद्धा सर्व तेच लोक आहेत. आणखी आमच्यात तरी मेळ कोठे आहे?"

"किती गांवाची अशी परिस्थिति आहे ?" आम्ही विचारलें.

"त्या जवळच्या आठ-दहा गांवाची." उत्तर मिळालें.

' वेळ होऊन गेला होता मला जवळच्या शाळेत झेंडावदनासाठी जायचे होते. या गाववाल्यांना मी कसे समजावू की स्वतंत्र भारताच्या झेंड्याखाली सर्व समान आहेत, निर्भय आहेत ? जे बाप-दादाच्या धरतीपासून उठवून दिले जात आहेत, ज्यांच्या स्वरवावर आणि सन्मानावर रात्रंदिवस प्रहार होत आहे ते कसे समजू शकतील की लद्दाखमधे चीनने आमची जमीन हडप केली आहे ?

असल्या वातावरणात कोणतीहि व्यवस्था किंवा विकासाची योजना समवनीय आहे काय ? शेजाऱ्या शेजाऱ्याची मने एकमेकापासून दूर असतील तर हातात हात घालून विकासाचे काम ते कसे करू शकतील ? प्रत्येकाची मन आपआपल्या जागी ठीक आहेत पण गावची व्यवस्थाच अशी काही बनून गेली आहे की दोन अंतःकरणे आपआपसात मिळू शकत नाहीत आणि जर अंतःकरणे मिळू शकत नाहीत तर मग ग्राम-भावना कशी बनावी आणि गावाचा सामूहिक पुरुषार्थ कसा जागृत व्हावा ? जर असा एखादा उपाय निघाला की ज्यामुळे शिवाजीराव व दगडूभाऊ त्याचप्रमाणे गावातील अन्य लोक, हें समजू शकतील की एक गाव व एकाच धरतीचे रहिवासी आपण लोक या सर्वांचे हित एकच आहे आणि जर सर्व मिळून आपण काम करू तर सर्वांचे हित साधणे शक्य आहे, तर आजसुद्धा गावात जी शक्ति व साधनें आहेत त्याच्या योगानेच गाव पुष्कळ पुढे जाऊ शकते, गावाची पुष्कळ उन्नति होऊ शकते पण हे केव्हा घडणार ?

● ●

# मूठभर दाणे : ५ :

पण ... हा 'पण' फार मोठा आहे. कालवे, पूल, शाळा, सडका, कारखाने, इत्यादींच्या योजना तर खूप बनल्या आणि बनूनहि राहिल्या आहेत, पण अंतःकरणे जोडण्याच्या योजना कधी बनल्या ? जमिनीसाठी डोकी तर नेहमी फुटत आली, पण स्वराज्याच्या या नव्या जमान्यात दलबंदीने लोकांची अंतःकरणे पार तोडून मोडून टाकली आहेत. आणि विकासाच्या सरकारी योजनांनीसुद्धा गावागावांत जोडण्याचे काम ज्यांच्यावरच सोपविले जे पहिल्यापासून तोडण्याच्या कामात वस्ताद होते. ग्रामपंचायतीने तोडले, बी. डी. ओ. ने तोडले, पक्षांनी-पार्ट्यांनी तोडले, जोडले कोणी ? ऐक्य व्हावे म्हणून भाषणे पुष्कळ झाली, पण भाषणांनी एखादी समस्या सुटली आहे असे दृश्य गावच्या सामान्य लोकांना काही आढळून आले नाही. याच्या उलट गेल्या अठरा-वीस वर्षांत सरकारचे जे काही कायदे बनले, विभाग उघडले गेले, त्यावरून बाहेरचे जे भेटी पुढारी आले व गेले, त्यांच्यामुळे काही नवीन भिंतीच उभ्या झाल्या, एखादी जुनी भिंत पडली मात्र नाही असे त्यांना दिसून आले. स्वराज्य सुरू होण्याच्या दिवसांत जनतेच्या मनात जो उत्साह निर्माण झाला होता तो हलके-हलके नाहीसा झाला. त्या जागी मन कटुता व निराशा यांनी भरून गेले आहे. परिवर्तन करण्याची प्रेरणाच समाप्त झाली आहे

स्वराज्याचे जे नवे सरकार बनले त्याच्याकडून अशी घोषणा झाली की इंग्रजी जमान्यात पोलीसच सरकार होते, पण नवीन सरकार हे कल्याणकारी सरकार आहे. त्याचे काम केवळ शासन चालविणे एवढेच नाही, तर जनतेचे कल्याण होईल अशा उद्देशाने व पद्धतीने ते चालवायचे आहे. पण झाले आहे असे की पुढारी आणि शासकांच्या मनात जे कल्याणाचे चित्र होते त्याहून निराळे चित्र त्या जनतेच्या मनात होते. तिने स्वराज्यापासून निरनिराळ्या प्रकारच्या आशा अपेक्षिल्या होत्या. त्या दोन चित्रांत फारच मोठा फरक होता. सरकारने राउरकेला, भिलाई,

भाखरा-नानगल याना नवीन भारताचे मंदिर, मशीद किंवा चर्च मानले होते. याच्यापेक्षा निराळें जनतेने जें काही मानले होते त्याची चमक त्या दिवशी सायंकाळी म्हातान्या आजीबाईच्या फटकान्यात मिळाली

पदयात्रेच्या कार्यक्रमाच्या निमित्ताने मी एका शाळेत उतरलो होतो. सध्याकाळी सभेनंतर जरा उशीराने जेव्हा मी माझ्या उताराच्या जागी आलो तेव्हा दारापाशी एक म्हातारी बाई बसलेली दिसली मी विचारले, "काय आहे ? येथे का बसली आहेस?" म्हणाली, "मी फार गरीब आहे मला दाणे पाहिजेत " मी उत्तर दिले, "दाणे येथे कुठे आहेत ? माझ्याजवळ ते देण्या-देवविण्याचें काही नाही. जें काही सागावयाचे होते ते सर्व सभेत सागितले आहे तू घरी जा " म्हातारीने ऐकून घेतलें, पण तशीच बसून राहिली. सरतेशेवटी मी जरा दाटून बोललो तेव्हा ती हलके हलके उठली, आणि असे बोलत-बोलत जाऊ लागली— "एवढें मोठें भाषण देऊ शकता पण माझ्यासाठी एक मूठभर दाण्याची मात्र सोय करू शकत नाही ?" उघड आहे की या प्रश्नाचें माझ्याजवळ काही उत्तर त्या वेळी नव्हते व आजहि नाही पण माझ्याजवळ नसले तर आहे कोणाजवळ ? काय पुढायाजवळ आहे ? शासकाजवळ आहे ? सुधारणावाद्याजवळ आहे ? काय मुंबईत आहे ? दिल्लीत आहे ? आहे कुठे ? या प्रश्नाचें उत्तर मिळवण्यासाठी करोडो लोकाना किती दिवस वाट पाहावी लागेल, कोण सागू शकेल ? ज्या देशामधे शभरापैकी अगदी खालच्या दहा लोकाजवळ रोज खर्चासाठी मोठ्या मुश्किलीने फक्त २७ पैसे असतात, आणि शंभरापैकी साठाना रोज फक्त ४७ पैशामधेच गुजारा करावा लागतो, तेथे करोडो लोक स्वराज्यच काय पण प्रत्यक्ष परमेश्वरालासुद्धा भात-भाकरी सोडून दुसऱ्या कोणत्या स्वरूपात पाहू इच्छितील ? एका बाजूला आहे कल्याणकारी शासननीतीचे चित्र आणि दुसरीकडे आहे कोटि-कोटि लोकाच्या आकाक्षा आणि आवश्यकता ! या दोहोंत कोणत्याहि प्रकारचा मेळ बसत नाही जेव्हापासून त्याना मताचा अधिकार मिळाला तेव्हापासून त्याच्या मनात हलके हलके प्रश्न उठू लागले आहेत की आपल्या एका कागदी-चिटोर्याने सरकार बनू शकते किंवा बिघडू शकते, पण अशी

काणती गोष्ट आहे की पोटासाठी भात-भाकरीची आणि शरीरासाठी अगभर कपडयाल त्याची मात्र व्यवस्था नाही होऊ शकत ? त्याच्या या प्रश्नाचे उत्तर त्याना काही मिळत नाही केवळ ती म्हातारी एकटीच प्रश्न विचारीत नाही आहे, तिच्याबरोबर या देशातील कोटयवधि लोक विचारीत आहेत त्याची आशा 'हाय-हाय' चे रूप घेऊन राहिली आहे– आणि जनतेच्या 'हाय-हाय'मधे ज्वालामुखीच्या विस्फोटाची शक्ति असते

सरकारने आपल्या ज्या सत्तर-पचाहत्तर लाख अधिकारी व कर्मचाऱ्याच्यावर जनतेच्या कल्याणाची जबाबदारी सोपविली आहे, खास करून गावाच्या, ते कोणत्याहि गावात गेले नाहीत, कोणत्याहि गावच्या सर्व लोकाना एकत्र बसवून गोष्टी केल्या नाहीत. मजुराना विचारले नाही – "तुम्हाला वर्षातून किती दिवस काम मिळते ? काय मिळवता ? गुजराण कशी होते आहे ?" बटाईदाराला विचारले नाही -- "मालकाला दिल्यानतर तुमच्या पोटासाठी काय उरते ?" कारागिराला नाही विचारले– "तुमचा माल किती होतो ? किती विकला जातो ? काय मिळवता ? तुमचे व तुमच्या पोरावाळाचे पोट भरते किंवा नाही ?" जर त्यानी ही विचारपूस केली असती तर त्याना समजले असते की गावातील साठ-सत्तर-ऐंशी टक्के लोक कसे राहत आहेत, त्याच्या समस्या काय आहेत, आणि त्याचे समाधान करण्याची दिशा कोणती आहे ? त्यानी तर गाववाल्याना बोलण्याचा अवसरसुद्धा दिला नाही 'जनतेचे कल्याण आपण जास्त समजतो, जनता स्वत: काही समजत नाही, असे सरकारचे पुढारी व अधिकारी धरूनच चालले, त्याच्या हे नाही लक्षात आले की गावाच्या ज्या विशाल श्रमिक-समुदायाला ते उपेक्षा करून सोडून देत आहेत तो शेष-नाग आहे. पृथ्वी त्याच्यावरच टिकून राहिलेली आहे. त्याच्याच श्रमाने शेती होत आहे, पशुपालन होत आहे, घरे बनत आहेत, उद्योग-धदे चालत आहेत. त्याला सोडून देण्याचा अर्थ, सरकारने स्वत:ला जनतेपासून अलग करून घेतले आहे असा होतो. त्यामुळे सरकारच्या योजनेत केवळ धड उरले आहे, प्राण नाहीसा झाला आहे. बस, एवढया चुकीमुळेच सरकार मार्फत होणाऱ्या कल्याणाचा आधार बदलून गेला, दिशा बदलून गेली,

कार्यक्रम व परिणाम बदलून गेला. कल्याण करण्याची दानत असूनसुद्धा सरकार कल्याण करू शकले नाही, आणि जनता चातकासारखी सरकारच्या तोंडाकडे पाहत पाहत स्वत चे कल्याण स्वत करण्याची शक्ति घालवून बसली कळत-नकळत कल्याणाच्या शासन-नीतीने गावोगाव दोन-दोन चार-चारचे असे गट बनवले आहेत की जे आज संपूर्ण गावाला नाचवून राहिले आहेत त्याच्या इशाऱ्याने मते पडतात, आणि त्याच्याच मर्जीनुसार गावचे जीवन चालत आहे जी शक्ति लोकाच्या हातातून निसटली ती या गटांच्या आणि नोकरशाहीच्या हातात जाऊन पडली.

खरी गोष्ट अशी आहे मागासलेल्या भारताला झपाट्याने मोठ्या देशाच्या बरोबरीला आणून पोहोचवायचे अशी सरकारची इच्छा म्हणून मोठ्या देशाच्या पद्धतीचा स्वीकार करावा अशी लालसा स्वाभाविकपणे त्याला झाली अमेरिकेने आम्हाला अन्न दिले, पैसा दिला, शस्त्रे दिली, आणि बुद्धिसुद्धा दिली बस, आमच्या देशात सामुदायिक विकासाची कामे सुरू झाली आम्ही मानून घेतले की गावाच्या रूपाने समुदाय तयार आहेच, फक्त त्याचा विकास करण्याचे काम बाकी आहे आणि गाव जसे होते तसेच स्वीकारले गेले जनतेमधे जाऊन, जनतेचे जीवन जर समजून घेण्याचे व पारखून घेण्याचे धैर्य दाखवले गेले असते तर आम्हाला समजून आले असते की जेथे समुदायच नाही, तेथे विकास कसला होणार ? आमच्या देशात मूळसमुदाय बनविण्याचे, म्हणजे गावाच्या भावनात्मक एकतेचा विकास करण्याचे, ग्रामभावनेचा विकास करण्याचे, सर्वात पहिले काम आजपर्यंत झालेच नाही. अशी परिस्थिति असूनहि आम्ही मानून घेतले की गावात पचायती राज्य कायम करून दिल्याने कल्याणाच्या योजनेत शासनाच्या बरोबरीने जनतेची भागीदारी होऊन जाईल. पण झाले काय की पचायत स्वत जनता-जनार्दनाचा आवाज न ✓ बनता प्रशासनाचेच एक अग बनून गेली

पचायत जर जनतेच्या मागणीप्रमाणे बनली असती तर तिला जनतेचा विश्वास प्राप्त झाला असता आणि भरपूर सहकारहि मिळाला ✓ असता, पण ती सरकारच्या कायद्याने बनली, म्हणून ती जनतेची प्रति-

निधि न होता, सरकारची दलाल होऊन बसली आणि आज तर प्रत्येक पचायत स्पर्धेची पैजबाजी व निवडणुकबाजी याचा अत्यत निकृष्ट तऱ्हेचा आखाडा बनून गेली आहे त्यामुळे जनता अगदी व्याकुळ होऊन गेली आहे, आणि कोठे कोठे तर दमनामुळे व भ्रष्टाचारामुळे लोक तिच नाव, पोलीस, कारकून किंवा मार्च नोकर याच्या बरोबरीने घेतात

साहजिक आहे की अशा परिस्थितीत कल्याणाच्या योजना जन-जीवनाला स्पर्श करू शकल्या नाहीत म्हणून गावचा माणूस योजना काय आहे याची पर्वासुद्धा करीत नाही कारण त्याला दिसून येते की योजनेत आपले काही स्थानच नाही कारखाना, रेल्व, सडका, शाळा, दवाखाना, मोटार इत्यादि तो सर्व काही पाहतो, पण चुलीवर भात किंवा तव्यावर भाकरी मात्र ता पाहत नाही मोठमोठा काम कशा होतात आणि भात-भाकरीचे ल्हानस काम का होऊ शकत नाही ? योजनच्या दोन्ही कामा-मधे काही विशेष विरोध आहे काय ? आणि हे कसल कल्याण आहे की जें गावे उजाड करीत आहे आणि शहर वसवीत व वाढवीत आहे ? ग्रामीण माणसाला सरकारी अधिकाऱ्याचे दमन आणि भ्रष्टाचार यापासून सुटका दिसत नाही गावात काय किंवा सरकारी कोट-कचेरीत काय, जागोजाग त्याला अनीति आणि अन्याय आढळून येतो म्हणून शाळा व दवाखाना यापासून त्याला सतोष होत नाही आणि जेव्हा त्याला हे दिसते की आजसुद्धा समाज पैसा दडुका व अधिकार याच्या ताकतीवरच चालत आहे त हा तो निराश होऊन शरणागति पत्करतो "सरकार माय-बाप" याशिवाय दुसर काही त्याला सुचतच नाही अशा परिस्थितीत जे काही करायचे ते सरकारने करायला हव, लोकामधे स्वत काही करायची ताकतच राहिली नाही पूर्वी जेव्हा पूर येत असत आणि बाध तुटून जात असत तव्हा गावातील मुले, तरुण, म्हातारे सर्व कुदळ-पावडे घेऊन धावून येत असत पण आज ते अर्ज घेऊन बी डी.ओ च्या कचेरीत धाव घेतात आम्ही इतके असहाय झालो आहोत

कल्याणाच्या शासन-नीतीचा असा भयकर वाईट परिणाम झाला आहे की जनतेने देशाच्या निर्माणापासून आपला हात मागे खेचून घेतला

आहे. आज अशी स्थिति होऊन गेली आहे कीं या लोक-तंत्रामधे 'लोक' कोठे आहेत याचा पत्ता लागत नाही. जेथें पाहाल तेथे तंत्रच तंत्र आहे. आणि स्थानिक अधिकाऱ्याच्या दमनामुळे व भ्रष्टाचारामुळे लोकांचा सरकारच्या सद्हेतूवर किती भरवसा राहिला आहे हे सांगणे कठिण आहे क्षोभ, निराशा आणि अकर्मण्यता यांनी अगदी शेवटची पायरी गाठली आहे.

जनतेने 'व्होट' देऊन जनतेच्या मताने बनलेलें सरकार, जनतेच्या करावर जगणारें सरकार, जर जनतेच्या मनातून उतरून जाऊ लागले, आणि देशाचें मीठ खाऊन आमच्या मनात देशाविषयी निष्ठा नसेल तर ही गोष्ट देशाच्या किंवा जनतेच्या कल्याणाची आहे असे कोण म्हणेल? गरीबाच्या मनात काय आहे याचा पत्ता त्या दिवशी मिळाला, जेव्हा मी एका धडधाकट तरुणाला विचारले– " तू ऐकले आहेस काय, चीनने आपल्या देशावर आक्रमण केलें आहे ?" उत्तर मिळालें– "होय, ऐकलें आहे." मी पुन्हा विचारलें– "मग चीनच्या विरुद्ध लढायला जाशील ?" "नाही" उत्तर आलें मी शेवटी विचारलें– "का नाही ?" उत्तर मिळालें– "आजसुद्धा मजूरी करूनच पोट पाळतो आहे, चीनवाला आला तर मजूर नाही ठेवणार मला ?" जर खंडातील ३५ कोटी लोकांना रोज सरासरी ६७ पैशावर जगायचें असेल तर राज्य कोणाचें आहे याची ते कशाला पर्वा करतील ? स्वराज्यानंतरच्या वीस-एकवीस वर्षांच्या अनुभवावरून कोटयवधि लोकांना राष्ट्रीयता व देश-प्रेम याच्या उद्-घोषाचा काहीहि अर्थ उरला नाही असे म्हणता येईल काय ? जर त्यांना देशाच्या योजनेमधे सन्मानाचें स्थान मिळण्याची आशा असती तर देशासाठी बलिदान करायला ते तयार झाले नसते का ?

● ●

# विरोध केवळ विरोध



आड्यातला जाडा तांदुळ ५० रुपये मण ! मातीच्या तेला (रॉकेल)-च्या एका बाटलीला जवळ-जवळ दोन रुपये, आणि तेहि सहज मिळत नाही. हिवरखेडच्या जवळ-जवळ प्रत्येक कुटुंबातील कोणी ना कोणी तरी नागपूर शहरात काम करीत आहे आणि आपल्या मुलाबाळासाठी महिन्या-काठीं वीस, पचवीस, तीस रुपये दरमहा पाठवीत असतो. जेव्हा पैसे असतात तेव्हा दुकानात तांदुळ नाहीत की ज्वारी नाही की गहू नाही. पण काळ्या बाजारात मिळू शकतात. जेव्हा रुपये संपून जातात तेव्हा सामान आहे पण रुपये कोठून येणार ? त्या दिवशी पोरें दिवसभर उपाशी राहिली म्हणून सीतारामने संध्याकाळी आपला हुंडा व गाईची कालवड विकून टाकली. शेजारच्या गावातील मजूर म्हणत आहेत की मजुरी धान्यात घेऊ, मालक म्हणतात पैशात घ्या. सरकारी धान्य येते तेव्हा मजुरी धान्यात मिळू लागते, नंतर पुन्हा पैशात होऊन जाते. त्यामुळे मजूर व मालकात हुज्जत चालते. कधी कधी तणातणीसुद्धा होऊन जाते. पाऊस पडला नाही, म्हणून शेतीचीं कामें बंद. मग काम नाही तर दाम कोठून येणार ? दाम नाही तर सामान कोठून येणार ? गोंड, कोरकु लोक जंगलातून पानं तोडून आणीत, पत्रावळी बनवीत, लाकडें तोडून आणीत व बाजारात विकीत. व्यापाऱ्यांनी पत्रावळीचे दाम वाढवले नाहीत, लाकडाचे थोडे वाढवले. जेवढ्या कमाईने पूर्वी दोन वेळा पोट भरत असे तेवढ्यात आता एक वेळ भरणंहि मुश्किल झाले आहे. शहरातील गहू-तांदुळ-साखर कोठें गडप होते याचा पत्ता लागत नाही. जगायचे आहे तर व्यापाऱ्याला, मी देईन त्या दामाला, पत्रावळी विकल्याच पाहिजेत व त्याच्याच जवळून तो मागेल त्या भावाने डाळ, तांदूळ, ज्वारी घ्यायचे आहेत. नाही घ्यायचे म्हटले तर उपाशी मरा.

कित्येक दिवसांपासून गावात धामधूम आहे. दिवस-रात्र पहारा. दोन पार्ट्या झाल्या आहेत, त्यांत खेडें फाटलें आहे. अर्ध्या-अर्ध्या रात्री-

पर्यंत जाती-जातीच्या अलग-अलग बैठकी भरत आहेत. भिंतीवर मोठमोठे 'पोस्टर' (जाहिराती) चिकटवले गेले आहेत. ज्याच्या त्याच्या तोंडी निवडणुकीची चर्चा. या वेळेस हरबाहि उभे राहिले आहेत. पूर्वीचे जे पुढारी मल्हारी मार्तंड ते दुसऱ्यादा उभे आहेत. दोघेहि कित्येकदा सीतारामकडे येऊन गेले आहेत. दोघानी त्याला सांगितले आहे : "तुला आपले मत मला तर द्यायचेच आहे पण पुन्या हिवरखेडचीं मते तुझ्या माथी आहेत." हरबा व मल्हारी मार्तंड दोन्हीहि श्रीमंत माणसे ! त्याच्या मालकीची शेकडो एकर जमीन आहे शिवाय सावकारी आहेच. दोघेहि या वेळी ३५ रुपये मण जाडें भात (धान) विकून राहिले आहेत

ज्या दिवशी हरबा मताबाबत बोलणे करायला आले होते त्याच्या आदल्या दिवशी सध्याकाळी सीतारामने आपला हंडा व गोन्ही (बछडी) विकून टाकली होती. त्याच्या मोहल्ल्यातहि पचायत-निवडणुकीची चर्चा चालू आहे. पण मोहोल्लेवाल्यात एकमत नाही कोणी म्हणतो : "या (महागाईच्या) सकटात कोण आमचा झाला ? कोणी आम्हाला ३५ रुपयाचे कमी करून ३० रुपयात भात दिले ? वडे लोक सगळे वडे आहेत. आम्हा छोट्याचा कोणी नाही आम्ही कशाला पडावे या झंझटीत ? परमेश्वराने दु ख धाडले आहे, तोच दूर करील तें !" दुसरा म्हणतो : "काहीहि असा, मत आम्हाला दिले पाहिजे आज नाही तर उद्या आमचे दु.ख कोणी तरी पाहीलच आणि त्याची मुनावणी होईल"

सीतारामचा अभिप्राय आहे – "हें ठीक आहे की गावात आम्ही राहतो तर गावात जें होत आहे त्यापासून आम्हाला अलग कसे राहता येईल ? पण मला हें समजत नाही की एकीकडे आमच्यासारखे किती तरी लोक बरबाद होत आहेत आणि दुसरीकडे ही निवडणुकीची दंगल रचली गेली आहे ! हेंच काम सरकारला या वेळीं जरूरीचे वाटलें ? नवीन पचायत झाली तर ती काय गावाच्या सुखदुःखाकडे अधिक लक्ष देईल ? पचायती तर पुष्कळ दिवसापासून झाल्या आहेत. कोणत्या पचायतींने अन्न-वस्त्रासाठी काय केले ? जुन्या पचायतीच्या लोकानी काय केले आणि जे नवे होतील ते कोणते मोठे दिवे लावणार आहेत ? गावा-

बद्दल जर काही कळकळ असता तर ३५ रुपये मण भात विकले असते ? पण सर्वात जास्त विचार करण्यालायक मुख्य गोष्ट ही आहे की या निवडणुकीमुळे गावामधे जो वैरभाव पसरत आहे, जी दल-बदी होत आहे, या गोष्टी गावात कधी मेळ होऊ देतील, एकोपा होऊ देतील ? आणि जर मेळ होणार नसेल, एकोपा होणार नसेल, तर गावात काम काय होईल ? जो सरपच निवडून येईल त्याचा एक गट होईल, आणि जो येणार नाही त्याचा दुसरा गट होईल, तो पहिल्या गटाला काही काम करू देणार नाही. एक गट दुसऱ्या गटाचा शत्रु होईल. एक जात दुसऱ्या जातीची शत्रु होईल शत्रुत्वाच्या या चक्रामधे गरीबच पिसला जाणार नाही काय ? सरकारीच गावाबद्दल, गरिबाबद्दल प्रेम असते तर निवडणुकीची ही लढाई न होता दुसरेच काही तरी काम झाले असते. माझ्या तर अल्प-बुद्धीला असेच वाटते की गावात सर्वांचे पोट भरायचे असेल, सर्वांच शरीर झाकायचे असेल, प्रत्येकाला रोजगार द्यायचा असेल, मुलाबाळासाठी काही करायचे असेल, आपसात मिळून मिसळून राहायचे असल, तर या निवडणुकाची काय गरज आहे ? गावच्या सर्व लोकांनी एकत्र बसावे आणि आपसात मिळून एकाच्याने अशा पाच-सात माणसाना निवडून द्यावे जे सद्‌भावी आहत, ज्यांच्यावर सर्वांचा विश्वास आहे. यामधे गटबाजी किंवा स्पर्धेचा कोणती बाब आहे ? सरकारने हा कायदा कशासाठी केला काही समजत नाही।"

सीताराम गरीब आहे, पण सर्व गोष्टी समजतो जे प्रश्न सीतारामच्या मनात उठले आहेत ते प्रश्न आज गावच्या बहुतेक सर्वांच्या मनात उभे राहिले आहेत. परंतु ज्यांचा या लढ्यामुळे स्वार्थ साधणार आहे किंवा ज्यांच्याजवळ पुरेसा पैसा व फुरसत असल्यामुळे जे आनदात या लढ्याची मजा चाखू पाहतात असे लोक चूप बसले आहेत

( एक तर सरकारी पक्षपाती राजांचा कायदा करून ही लढाई गावोगाव सुरू करून दिली आहे आणि दुसरी गोष्ट म्हणजे राजकीय पण आपल्याला सर्व मिळविण्यासाठी आतील तेच आहेत. ते कायदेशीररीत्या आपला उमेदवार उभा करीत नाहीत पण पक्षांच्या

स्वातंत्र्य प्राप्त करून घेतले आहे व जे वेगाने प्रगति करू इच्छितात पण जे दीर्घकाल सामंतवाद व गुलामगिरी यामुळे आपले भांडवल, कारागिरी, सहकार-शक्ति व चारित्र्य गमावून बसले आहेत अशा आशिया आफ्रिकेतील सर्वच देशांची आहे. अशा परिस्थितीत या सर्व देशांच्यासमोर हे एक आव्हान आहे की त्यांनी लोकशाही राखावी व विरोधाची राजनीति सोडून द्यावी व देशात जें काही भांडवल, बुद्धि, शक्ति व चारित्र्य शिल्लक असेल त्याचा पूर्ण उपयोग देशाच्या प्रगतीसाठी करावा.

विरोधाच्या राजनीतीने देशाला गृह-युद्धाच्या किनाऱ्यावर आणून पोहोचविले आहे. लहान लहान बाबी ज्या आपसात बसून सहज सुटू शकतात त्या विरोधाच्या वातावरणात संकटाचे रूप धारण करतात. आणि देशाच्या मोठमोठ्या प्रश्नाबाबत — ज्याच्यासंबंधी संपूर्ण देशाच्या हिता-हिताच्या दृष्टीने विचार व्हायला पाहिजे — आपला पक्ष आपले राज्य व आपला जिल्हा याच्या पुरता अगदी एकांगी दृष्टीने विचार होऊ लागतो. देश सर्वांच्या वर आहे. पण विरोधाच्या राजनीतीमधे पक्षच सर्वेसर्वा होऊन बसतो. पक्षहि नाही, पण तो गट ज्याच्या हातात सत्ता आहे, व गटातसुद्धा तीं दोनचार माणस, ज्याच्या इशाऱ्यावर गट नाचतो. विरोध ही अशी बाब आहे जी विवेक नष्ट करून टाकते, आणि जेव्हा विवेक नष्ट होऊन जातो तेव्हा मनुष्य संकुचित व स्वार्थी बनतो. याच कारणामुळे आज राजनीतीमधे सेवेची भावना जवळ जवळ नष्ट झाली आहे. सत्ता परमेश्वर बनून गेली आहे व खुल्लखुल्ली तिचीच उपासना होत आहे. सत्तेसाठी जें काही केले जातें ते सर्व योग्य मानले जात आहे. अशा परिस्थितीत स्वाभाविकपणच सार्वजनिक जीवन व सार्वजनिक कार्यकर्त्याचे स्थान लोकांच्या नजरेतून झपाट्याने, . आहे.

पसातल्या झगड्यात खलास होईल. त्याचा परिणाम असा होईल की लोकांचा असंतोष वाढेल व त्यांना वाटू लागेल की असल्या निकम्म्या लोकशाहीपेक्षा फौजी-शासन चागले आहे. आणि मग एक दिवस एखादा हुकुमशहा उभा राहील व लोकशाही समाप्त करून टाकील. हेच पाकिस्तानमधे झाले, ब्रह्मदेशात हेच झाले.

आज आशिया-आफ्रिकेत सर्व दूर हुकुमशाहीची हवा वाहते आहे. आम्हालाहि त्या हवेत वाहून जायचे आहे काय ? हुकुमशाहीमधे अन्न, इज्जत, व स्वातंत्र्य यावाबतच्या लोकाच्या समस्या सुटतील हा शुद्ध भ्रम आहे हुकुमशाहीची सर्वात जास्त मागणी ते लोक करीत असतात (१)जे समाजाचे परिवर्तन इच्छित नाही, कारण त्याना वाटते, परिवर्तना-मुळे त्याचे विशेष अधिकार, विशेष हितसबध नष्ट होतील. (२) जे असा व्यवसाय करतात ज्यामधे ठराविक बाधलेली मिळकत प्राप्त होत असते आणि त्याना बाजारावरच निर्भर राहावे लागते. कारण त्याना वाटते की डिक्टेटर (हुकुमशहा) बदुकीची भीति दाखवून बाजारभाव ठीक राखील पण जनतेच्या शक्तीला तुडविणारी हुकुमशाही फार काळ स्थिर राहू शकत नाही किंवा जनतेच्या समस्या सोडवू शकत नाही हे त्याना समजत नाही कारण विज्ञानाच्या या काळात समाजाचा विकास, त्याची सुरक्षा व त्याची स्वतत्रता जनतेच्याच शक्तीने टिकणे सभवनीय आहे, हुकुमशहाच्या बदुकीच्या गोळीने नव्हे. एवढे खरे की पुढाऱ्याची आपापसातील शिवीगाळ हुकुमशहाच्या गोळीसाठी रस्ता साफ करून देते. म्हणून देशाला जर त्या धोक्यापासून वाचवायचे असेल तर विरोधाच्या राजनीतीचा पर्याय शोधून काढण्यास उशीर करता कामा नये. पण तो पर्याय कोण शोधून काढील ?

● ●

# मदत कोणती व किती ? : ७ :

आमच्या देशात अशा काही संस्था आणि असे काही लोक आहेत जे सरकार व पक्षोपपक्षांच्या राजकारणापासून अलिप्त राहून व सर्व प्रकारचा भेदभाव सोडून समाजाच्या सेवेत मग्न आहेत त्यांच्या नजरे-समोर नेहमी दरिद्रनारायणाचे चित्र असते खादी-ग्रामोद्योगाचे काम याच भावनेने होत असते, व दुसऱ्या कित्येक संस्था, शाळा, दवाखाने, कुष्ठधाम आदि याच भावनेने चालविनात हजारो लोक अशा प्रकारच्या कामाला लागलेले आहेत आणि विशेषतः ज्यांच्याकडे समाज किंवा सरकार यांचे लक्ष नाही अशा लाखो लोकांना मदत पोहोचवीत आहेत ही मदत फार आहे असे नाही, तरीहि ज्याला दुसरा काही आधार नाही त्याला आधार तर होऊनच जातो पण समाजात झपाट्याने वाढणाऱ्या समस्यांमुळे अशा तऱ्हेच्या मदतीच्या कामात एक मोठा प्रश्न उभा झाला आहे.

स्वराज्याच्या गेल्या अठरा वर्षांमध्ये मदतीचे काम करणाऱ्यांची संख्या खूप वाढली आहे पण त्या मदतीची गरज असणाऱ्या गरीबांची संख्या त्यापेक्षाहि अधिक झपाट्याने वाढली आहे. जर माझी इच्छा असती तर त्या दिवशी गावातील एखाद्या व्यक्तीपासून मागून किंवा माझ्या स्वत जवळूनसुद्धा त्या म्हातारीसाठी एक नाही दोनचार मुठी तांदुळाची व्यवस्था मी करू शकलो असतो पण शेवटी किती दिवस आणि किती लोकांना अशा तऱ्हेची मदत देता येईल ? जर गरीब, बेकार, आजारी व निराधार लोकांची संख्या वाढतच चालली तर मदत कोठपर्यंत पोहोचविता येईल ? गरीबी किंवा बेकारी कायमची नष्ट करता येणार नाही का, याबाबत आम्ही विचार करावा अशी वेळ आता आली नाही काय ? विज्ञान म्हणते की असा समाज बनू शकतो. जर खरोखरच असा समाज बनू शकला तर किती चांगले होईल ? म्हणून आजच्या समाजातील लोकांचे दुःख दूर करण्यासाठी स्वतः त्रास सोसून जे लोक दुसऱ्यांची सेवा करीत आहेत त्यांनीच विचार करायला पाहिजे की या दुःखापासून मुक्त

नवा समाज कसा बनेल. जर असा समाज बनला नाही तर या विज्ञान-युगात आम्ही असेच म्हणत राहणार काय की सुखी-दुःखी, गरीब-श्रीमंत, स्पृश्य-अस्पृश्य या सर्वांना परमेश्वराने निर्माण केले आहे आणि हे नेहमी असेच राहणार आहे ? या युगात ही गोष्ट चालणार नाही.

परमेश्वराने माणसाला जी बुद्धि दिली आहे त्या बुद्धीच्या बळावर त्याने अशी साधने व उपाय शोधून काढले आहेत की ज्यामुळे प्रत्येक व्यक्ति सुखी होऊ शकते या साधनाचा आणि उपायाचा योग्य उपयोग करण्याचीच मात्र आवश्यकता आहे परन्तु आजच्या समाजाची बनावटच अशी आहे की त्यामध्ये एकाला सुखी राहण्यासाठी दुसऱ्या दहाना दुःखीच राहिले पाहिजे. मजूर मेहनत करील तर मालकाचे घर भरेल, लोक झगडा करतील तर वकीलाला फी मिळेल, साथीचे रोग पसरतील तर डॉक्टरला आनंद वाटेल, कोणी जाळ्यात फसला तर पोलीसाला लाच मिळेल – जर अशा प्रकारची समाज-रचना असेल तर कोण आपणहून सुखी व निश्चित राहील ? यात दोष कोणाचा मानायचा ? लोक वाईट आहेत काय ? किंवा समाजरचनाच अशी आहे काय की इच्छा नसतानाहि माणसाच्या हातून चुकीची कामे होऊन जातात आणि चुकी कळल्यावरहि ती सुधारू शकत नाही ? समाज बदलेल तेव्हाच या परिस्थितीत सुधार होऊ शकेल.

आजचा समाज दोन पायाच्या आधारावर उभा आहे – सत्ता व संपत्ति. समाजाच्या जीवनासाठी सत्ता व संपत्ति दोन्ही आवश्यक आहेत. पण या गोष्टी थोड्या लोकांच्या हातात केंद्रित झाल्या तर सत्ता दमनाला कारणीभूत होते व संपत्ति शोषणाला कारणीभूत होते. आज हेच होत आहे. सत्ता सरकारच्या हातात केंद्रित झाली आहे आणि संपत्ति बाजारात केंद्रित झाली आहे म्हणून सरकारमार्फत दमन होत आहे आणि बाजारा-मार्फत शोषण होत आहे वास्तविक रीतीने सरकार रक्षणासाठी आहे आणि बाजार पोषणासाठी आहे जर सत्ता व संपत्ति यांचे इतक्या व्यापक स्वरुपात कुचक्र चालत राहील व ती दोन्ही अशी संगठित राहतील तर सेवा किती मदत देऊ शकेल ? आणि तिचे स्थान काय राहील ? अशा स्थितीत हे स्पष्ट आहे की सेवादेवीला एक असा नवा समाज तयार

करण्याचे काम हातीं घ्यावे लागेल ज्यामधे सत्ता आणि संपत्ति दोन्हीहि सरकार व बाजार यांच्या हातून काढून घेऊन समाजाच्या हातात वाटली जातील हें काम मदतीच्या मार्गाने पूर्ण होणार नाही. हे काम क्रांतीचे आहे, समाज परिवर्तनाचे आहे, मुक्तीचे आहे म्हणून आता सेवेमधे क्रांतीची शक्ति आली पाहिजे म्हणजे तिला मुक्तीचा संदेश पोहोचविणे शक्य होईल जनतेला मुक्तीसाठी तयार करणे ही सेवेची पहिली जबाबदारी आहे.

सेवा-संस्था जर क्रांतीचे काम करणार नाहीत तर त्यांची काय अवस्था होईल? ज्या दिवशी जनतेच्या लक्षात येईल की तिच्या दमनाचे व शोषणाचे मूळ कारण सत्ता व संपत्तीचा सांप्रतचा (सामाजिक) साचा हे आहे त्या दिवशी ती या साच्यातून निसटण्याच्या उद्योगाला लागेल, भाकरीच्या काही तुकड्यांच्या मोहात गुरफटणार नाही त्या वेळीं तिला जर हें दिसून आले की मदत करणाऱ्या सेवा-संस्थांतील लोक मुक्तीच्या क्रांतिकार्यात तिचा साथ करीत नाहीत तर ती त्यांना सोडून पुढे पाऊल टाकील. तेव्हा जनतेची शक्ति गमावून बसलेल्या सेवेला सत्ता व संपत्ति यांनाच शरण जावे लागेल, आणि त्यांच्याच कृपा-छत्राखाली, त्यांचेच एक अंग बनून जगावे लागेल. आपल्या परिचित, निःस्वार्थी, सिद्धहस्त सेवकाचा आधार न मिळाल्यामुळे योग्य मार्ग सोडून जनता उपद्रवाच्या किंवा षड्यंत्राच्या आड मार्गाला लागू शकेल. तो मार्ग समाजाच्या सर्वनाशाचा होईल आज जर मुक्तीचा दुसरा सुलभ मार्ग तयार आहे तर क्रांतीच्या नावावर उपद्रव व षड्यंत्र यांचा आडमार्ग का धरावा?

# मुक्तीसाठी कुणीकडे ? : ८ :

आणखी काही झाले असो किंवा नसो, एवढे मात्र जरूर झाले आहे की देशातील लोक समजू लागले आहेत की–

(१) 'कल्याणकारी शासन-नीती'ने म्हणजे सरकारी योजनांनी व सरकारच्या नोकरशाहीमार्फत आपले कल्याण झाले नाही आणि होऊहि शकणार नाही

(२) 'विरोधाच्या राजनीती'ने आपली शक्ति घटली आहे आणि एक-एक गाव व एक-एक शहर सत्तेसाठी होणाऱ्या गृह-युद्धाचा आखाडा बनले आहे

(३) 'मदतीच्या सेवा-नीती'मुळे पुरेशी मदतहि मिळाली नाही, उलट दिवसेदिवस मदतीची आवश्यकता मात्र वाढत गेली. हा रस्ता मुक्तीचा नव्हे

लोकाच्या हहि लक्षात आले आहे की या तिन्ही नीति, सत्ता व सपत्ति याच्या मार्फत होणारे दमन व शोपण थोडेंमुद्धा कमी करू शकल्या नाहीत जोपर्यंत हा ढाचा चालू राहील तोपर्यंत आपल्याला अभाव, अज्ञान, व अन्यायाला बळी पडणे भागच पडेल म्हणून यातून मुक्त होण्यासाठी या तिन्ही निष्फळ नीतीहून निराळी दुसरी एखादी नीति ( धोरण ) शोधावी लागेल हे निश्चित आहे की ती नवी नीति लोकाच्या आपल्या स्वशक्तीच्या म्हणजे लोकशाहीच्या आधारावर उभी असेल म्हणून ती क्रातिकारक राहील ती सत्ता-सपत्तीच्या चालू साच्यामधे आमूलाग्र फरक करण्याचा प्रयत्न करील भारताचे 'लोक' भारताच्या पाच लाख गावा-मध्ये आहेत म्हणून त्याची शक्ति सर्वप्रथम तेथे प्रगट होईल. याचा अर्थ गावात सत्ता-सपत्तीचे काही नवीन स्वरूप प्रगट होईल आणि त्यामुळे दमन व शोपण या प्रचलित सबधाच्या जागी समता व बधुभाव हे नवे सबध प्रस्थापित होऊ शकतील.

लोकशक्तीच्या जोरावर होणाऱ्या लोकक्रांतीचा शुभारंभ गावा पासूनच होईल वास्तविक आज गाव हे गाव राहिले नसून फक्त घराचा एक घोळका आहे तेथे गरीबी आहे, बेकारी आहे, बीमारी आहे, तेथे भयंकर झगडे व परस्परांविषयी अविश्वासहि आहे असे असूनहि हें निश्चित आहे की भारताचे खरे हृदय गावात आहे तेथेच भारताचे शेकडा पाऊणशे टक्के लोक राहतात गावाना वगळून भारताची कल्पना-सुद्धा केली जाऊ शकत नाही म्हणून गावच क्रांतीचा झरा असून तेथूनच खऱ्या क्रांतीची धारा प्रवाहित होईल

गाव सरकारी कायद्याच्या भरवशावर हात जोडून स्वस्थ बसू शकत नाही त आपल्या निर्णयानेच आपल्या मुक्तीची घोषणा करील कल्याण-कारी शासन नीति, विरोधाची राजनीनि आणि मदतीची सेवानीति या तिन्ही नीतींचा ते सर्वप्रथम अस्वीकार करील ते म्हणेल– आम्ही या प्रत्येकीचा अनुभव घेऊन चुकलो आहोत आता याच्याने कार्यभाग होणार नाही या त्रिविध अस्वीकृति ('नाही ) पासूनच त्याच्या मुक्तीचा मार्ग सुरू होईल

दुसरें पाऊल होईल – गावच्या सत्ता संपत्तीच्या चालू साच्यामधे परिवर्तन, तेहि आपल्या स्वयं-निर्णयाने नतर भलेहि सरकार गावच्या निर्णयावर आपल्या कायद्याचा शिक्कामोर्तब करो !

गाव आपली सत्ता आपल्याच मताने दुसऱ्याच्या स्वाधीन करीत असतें आता ते तसं करणार नाही आपली सत्ता ते आपल्या जवळच ठेवील

गावची मुख्य संपत्ति आहे जमीन आज ती जमीन थोड्या लोकांच्या हातात केंद्रित आहे जमिनीची मालकी साऱ्या गावाची होईल. शेती करण्याचा अधिकार कुटुंबाचा राहील व तिची मालकी गावाची राहील शेतीसाठी मालकीची जरूरी का मानली जावी ?

गाव दुबल व असहाय आहे म्हणून त्यान आपली व्यवस्था व सुरक्षा दोन्ही सरकार व त्याचे नोकर यांच्या हातात सोपवून दिली आता गांव आपली व्यवस्था व रक्षण स्वत करील आपल्या विकासाची योजना ते स्वत बनवील ती योजना गावच्या सहकार-शक्तीने चालेल सरकार जी

मदत देऊ शकेल ती घेतली जाईल. सहकार-शक्ति मुख्य राहील, सरकारी मदत गौण.

त्रिविध-मुक्तीच्या या योजनेत विरोध कोणाशीच नाही पण 'विद्रोह' (बंड) संपूर्ण आहे – आपला निर्णय, आपली शक्ति, आपली योजना भारतातील प्रत्येक गाव अशा तऱ्हेने आपल्या मुक्तीची घोषणा करील तर शांतिमय क्रांतीचे एक अद्भुत दृश्य पाहायला मिळेल परंतु आजच्या मोडकळीस आलेल्या गावात असे बंड करण्याची ताकत आहे काय ? होय, आहे ! परंतु खरी अडचण ही आहे की जनता भ्रम-जालात अडकलेली आहे, व तिच्या सुप्त शक्तीमध्ये क्रांतिकारकाची श्रद्धा नाही सरकारला आपल्या शक्तीत श्रद्धा आहे, पक्षोपपक्षाना आपापल्या शक्तीत श्रद्धा आहे पण जनतेच्या शक्तीत कोणालाच आज श्रद्धा नाही. जन-शक्तीत श्रद्धा असल्याशिवाय समाजात क्रांतिकारी परिवर्तन कसे घडून येणार ?

जनतेत शक्ति आहे पण ती जागृत करावी लागेल लोक-शक्ति कायद्याने जागृत होणार नाही, किंवा विरोधाने व कारस्थानानेहि जागृत होणार नाही. कायदा नोकरशाहीची ताकत वाढवतो, विरोध व कारस्थाने पक्षाची शक्ति वाढवतात. याहून भिन्न अशी जर स्वतंत्र लोक-शक्ति विकसित करायची असेल तर आम्हाला जनतेच्या बुद्धीवर व भावनेवर विश्वास ठेवावा लागेल आम्ही हें समजून चालले पाहिजे की जनता परिस्थितीला ओळखील, ओळख पटल्यावर परिवर्तनाच्या विचाराचा स्वीकार करील, आणि त्याला अनुसरून स्वत निर्णय घेऊन आचरण करील. आजच्या परिस्थितीमुळे जितका व्यापक असंतोष आहे तितकीच मुक्त होण्याची आकांक्षाहि आहे खरी आवश्यकता आहे श्रद्धापूर्वक मुक्तीचा मार्ग दाखविण्याची !

○ ●

# मुक्तीची घोषणा

: ९ :

तळेगाव हे ल्हान-ल्हान शेतकऱ्यांचे एक लहानसे गाव. लहान असले तरी गाव आहे जोरदार! मुकदमबाजीमधे गेल्या १५-२० वर्षात आठशें एकर जमीन विकून टाकली आहे! एवढेंच नव्हे तर काही खून-हि होऊन चुकले आहेत गावात दोन पक्ष आहेत – एकमेकांच्या रक्ताचे तहानेले आपापसात उठणे-बसणे खाणे-पिणं सर्व काही बंद!

बोलावले तर गावातले लोक एकत्र येतील? एकत्र झाले तरी आम्हा मंडळींचे म्हणणे ऐकून घेतील? आणि ऐकून घेतले तरी एकमत होऊन ते एखादा निर्णय घेऊ शकतील? समजा, उत्साहात येऊन एखादा निर्णय घेतला तरी, नतर एकत्र मिळून-मिसळून काम करू शकतील? वारवार आम्हा मंडळींच्या मनात हे प्रश्न उठत आणि वारवार आम्ही मंडळी माघार घेत होतो या गावच्या जीवनाला काही नवे वळण लागू शकेल असा प्रकारचा विश्वास आमच्या पैकी कोणालाच वाटत नव्हता सरते शेवटी असा विचार झाला की आपला शेजारी गाव आहे. एकदा भेटून तर पाहावे. प्रथम दोन साथी गेले, दोनतीन प्रमुख मंडळींना भेटले रोजचे जाणेयेणे होत, म्हणून त्यांनी म्हणणे ऐकून घेतले, पण कोणी काही उत्तर मात्र दिले नाही काय कराव हें आमच्या काही लक्षात येईना. पण एवढें ठरविले की थोड्या थोड्या परिवाराना अलग अलग एकत्र करून वारवार समजावून मागावे की भांडण करण्यात सर्वांचेच नुकसान आहे, सलोखा करण्यात सर्वांचा फायदा आहे. ही एवढी गोष्ट सर्व मानीत होते. कारण मुकदमबाजीच्या नुकसानीमुळे सर्व टेकीला आले होते मनात दुश्मनी होती, पण त्यातून सुटका होईल असा मार्ग मिळावा असे इच्छित होते घोर अधकारात प्रकाशाचा एवढाच बारीक किरण होता पण प्रश्न होता, मार्ग कोणता काढावा? तीनचार दिवस समजावून सांगितल्यानंतर सर्व लोक एक दिवस मोठ्या आंब्याच्या झाडाखाली एकत्र आले. आम्ही म्हणालो –

"झाल्यागेल्या गोष्टीच्या आठवणी उकरून काढण्यासाठी आम्ही तुम्हाला येथे एकत्र बोलावले नाही. आम्ही तुम्हाला एवढेच सागू चाहतो की परमेश्वराने तुम्हाला शेजारी-शेजारी बनवले तर मग तुम्ही शेजारधर्माने का नाही राहात ? विचार करा आणि जीवनाचा रस्ता बदला."

"तुम्ही गडळी आमच्या हिताच्या गोष्टी सागून राहिला आहात आम्ही लोकानी पुष्कळ भोगले आहे अगदी चौपट झालो आहोत. पण या दलदलीतून बाहेर कसे पडावे हे मात्र समजत नाही. जर कोणाचे मन कोणाशी जुळतच नाही तर गाव या दलदलीतून कसे निघेल ?"

"निघणे सोपे आहे झाल्या गोष्टी विसरुन जा. गावची सगळी व्यवस्थाच बदलून टाका आणि नव्या जीवनाला सुरवात करा बोला, आहात तयार ?"

"तयार का नाही ? पण कसे होईल, काय होईल, काही समजत नाही. या सगळ्या झगडयाचा निकाल कसा काय लावणार ? कुटुबातील झगडे निपटत नाहीत तर गावचे कसे निपटतील ? कोणी कोणाचे मानील ?"

"कोणी कोणाचे मानणार नाही तर न मानो ! गावचा निर्णय गाव मानील. सर्वांची मिळून जी ग्रामसभा होईल तीच जुने प्रश्नहि सोडवील"

"सागा बरे, ग्रामसभा कशी बनेल, काय करील ? सर्व काही स्पष्ट करून सागा."

"हे पहा, सारा झगडा जमिनीपासून आहे तर तेथूनच आरभ करू या."

"म्हणजे काय करायचे ?"

"जमिनीचा मालकी हक्क सोडून द्या."

"मालकी सोडून द्यायची ? मग मालक कोण होणार ?"

"ग्रामसभा."

"आणि मग शेतीचे काय ?"

"शेती तुम्हीच करायची. पण शेतीची मालकी ग्रामसभेला सोपवून द्या. सगळे झगडे नेहमीसाठी समाप्त."

'काय, हें हाऊ शकेल ?"

"तुम्ही सर्वजण मिळून तसं करायचें ठरवाल तर अडवणार कोण ? झगड्यातून मुक्ति पाहिजे असेल तर मालकीतून मुक्त होऊन जा"

"मुक्ति तर पाहिजेच आहे हं, पुढे सांगा"

"ऐका. गावात पचवीस किंवा त्यापेक्षा जास्त वर्षांचे वयात आलेले जेवढे स्त्री पुरुष आहेत त्या सर्वांची एक ग्रामसभा बनवा. त्या ग्रामसभेला आपल्या आपल्या जमिनीचे स्वामित्व समर्पण करा म्हणजे ग्रामसभा मालक होऊन जाईल तुम्ही लोक आताप्रमाणेच शेती कराल, पण शेत मालकी तुमची न राहता ग्रामसभेची होईल एवढें झाले तर सगळे झगडेच मपतील आणि जर एखादे वेळेस काही बाबा उद्भवलाच तर आजच्याप्रमाणे ग्रामसभा जमेल व निकाल करील कोणताहि मामला पोलीसाकडे किंवा कोर्टात का जावा ? ग्रामसभेचा निकाल सर्वांनी मानावा व आपापली शेती करावी "

"एकूण तुमचे म्हणणे तर फार चांगले वाटते तसच ग्रामसभा सर्वांची आहे तर तिला मालकी सोपविण्यात काय अडचण आहे ? पण हें सांगा की मालकी सोपविल्याने आमच्या शेतीला काही आच (हानि) तर लागणार नाही ?"

"नाही तुमच्या किंवा तुमच्या वारसाच्या मर्जीशिवाय तुमच्या जमिनीला कोणीहि हात लावणार नाही पण आजपर्यंत जें काही पाप झालें आहे त्याचे प्रायश्चित्त म्हणून एक गोष्ट तुम्हाला करावी लागेल "

"पाप काय झालें बाबा ? आम्ही लोक आपापसात झगडत राहिलो हेच ना पाप ?"

"नाही, तसं नाही. तुमच झगडे तर मालकीचे पण पाप हें झाले की ज्या शेत-मजुरानी आजपर्यंत शेताची सेवा केली त्याना तुम्ही जमिनी-पासून वंचित ठेवले आहे शेती नसणाऱ्या अशा या शेतीच्या सेवकानाहि जमीन मिळायला पाहिजे."

'ती कोठून येणार ? गावात जी पडित जमीन आहे तिच्यात गावची गुरेंढोरें चरतात"

"जमीन तुमच्याजवळच आहे तुमच्या शेती लायक जमिनीपैकी थोडा म्हणजे विसावा हिस्सा अलग काढा व ती जमीन कोणा भूमिहीनाला द्यायची हे तुम्ही स्वतःच ठरवा जमीनवाल्या प्रत्येकाने आपल्या जमिनीचा विसावा हिस्सा भूमिहीनासाठी द्यावा हच प्रायश्चित्त आता पुण्यकर्मांचे नवीन काम येथूनच सुरू करा आपल्या जमिनीचा विसावा हिस्सा देऊन बाकीची जमीन तुम्ही वाहा, पेरा आणि पीक घ्या या तुमच्या उरलेल्या जमिनीला तुमच्या किंवा तुमच्या वारसाच्या समतीशिवाय कोणी हात लावणार नाही."

"गावच्या गरीब बाधवासाठी एवढे करावे लागले तर ते तम काही फार नाही सर्वांनी मानले व मजूर केले तर ती फार चागली गोष्ट होईल"

"तुम्ही असं म्हणतात ही आनदाची गोष्ट आहे पण दुसऱ्या इतर मडळीनाहि विचारा कारण हे जर केलं नाही तर गावातील गरिबाना कसा विश्वास वाटावा की गावच्या लोकाची अत करणे बदलत आहेत ?

"श्री मोहनरावानी सागाव त्याचे काय मत आहे ते मोठे शेतकरी आहेत "

"आम्ही तर मजुराना वाहण्यासाठी जमीन देतच असतो यात बहुतेक एवढी नवीन गोष्ट दिसते की ही विसावा हिस्सा जमीन त्याला कायमची देऊन टाकावी लागेल मग तिच्यावर आमचा काही अधिकार राहणार नाही पण यामुळे जर गावाचे भले होत असेल व लोकाची मन जुळत असतील तर मी तयार आहे '

"विसावा हिस्सा तर मी सुद्धा देऊ शकतो पण माझ्या मनात दोन प्रश्न उठतात. दोनचारच शेतकरी असे आहेत की जे एवढा अधिक जमीन देऊ शकतील जास्त लोक तर लहान लहान तुकडे देणारे आहेत. हे लहान तुकडे घेऊन भूमिहीन काय करतील ? दुसरा प्रश्न असा की जर मजुरांजवळ आपली स्वतःची जमीन झाली तर मग आमची शेती कोण वाहील ?"

"तुमच्या दोन्ही प्रश्नांचे उत्तर असे आहे विसाव्या हिश्श्यासंबंधाने पहिली गोष्ट ही आहे की थोडी जमीनवाला असो अथवा अधिक जमीन-वाला असो, आपल्या गरीब बांधवासाठी दान देण्याचे पुण्य सगळ्यांना मिळाले पाहिजे आपल्या खुशीने विसावा हिस्सा जमिनीवरील आपला हक्क सोडून आम्ही या गोष्टीला मान्यता देतो की गावात राहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा गांवच्या जमिनीवर अगदी तसाच हक्क आहे, जसा भारतात राहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा भारतावर हक्क आहे, किंवा जसा हवेवर व पाण्यावर हक्क आहे विसावा हिस्सा जमीन देऊन गावाने हे जाहीर केल्यासारखे होते की गावातल्या गरिबाची जबाबदारी सगळ्या गावावर आहे.

आता लहान लहान तुकड्यांची बाब राहिली ज्याच्याजवळ कमी जमीन आहे अशांना त्यांनी दानात दिलेली जमीन ग्रामसभेमार्फत परत द्यावी म्हणजे त्याचा तुकडा त्याच्या जवळच राहील यानंतर जे तुकडे राहतील त्यांची अदलाबदल करून एकच करण्याचा प्रयत्न करा सरकारी चकबंदीची (तुकडे-जोड) वाट कशाला पाहावी? आपल्या गावची चकबंदी आपली आपण का करू नये? जर असे काहीच होऊ शकले नाही तर सध्या तुकडेच द्या, पण द्या जरूर हे तुकडेच अंतःकरणे जोडतील आणि जेव्हा अंतःकरणे जोडली जातील तेव्हा हेच काय पण गावातील सर्व तुकडे जोडले जातील"

"शेते वाहण्याचा प्रश्न कसा सुटणार?"

"तुम्ही स्वतः वाहू शकत नाही काय?"

"तो काळहि येणार आहे. एका दिवसात सगळ्या गोष्टी कशा होतील? आज मला तर एवढाच प्रश्न सर्वांत कठिण वाटतो आहे"

हे ऐकताच शिवाभाऊ एकदम बोलून उठला—"मालक, तुमची जमीन आम्ही मजुरीने किंवा बटाईने किंवा मक्त्याने एवढ्यासाठी नाही जोनीत की ती तुमची जमीन आहे, पण आमच्या पोटासाठी आम्ही ती वाहतो. जर तुम्ही आपली विसावा हिस्सा जमीन आम्हाला दिली तर आमची ही थोडीशी जमीन होईल व आम्हाला थोडासा आधार होईल.

पण तेवढ्या जमिनीने आमचा गुजारा थोडाच होणार आहे ! आम्ही तुमचे शेत का नाही वाहणार ? जर आम्हाला आमच्या गुजाऱ्याला पुरेशी जमीन मिळाली असती तरीसुद्धा मी म्हटले असते की या, तुम्ही आम्ही मिळूनच शेती करू या तुमच्याजवळ नागर वखर आहेत, बैल आहेत, चागले बी-बियाणे आहे, तुम्ही शिकले सवरले आहात, आणि मी चागल्या तऱ्हेने मेहनत करू शकतो जर आपण मडळी आपापसात मिळून मिसळून शेती करू तर उत्पन्न आजच्यापेक्षा किती तरी पटीने अधिक होईल, आणि आपण मेहनत मजूरी, नागर, बैल, इत्यादींचा हिशोब करुन, म्हणजे शेती वाहण्याचा खर्च काढून पीक वाटून घेऊ. हा तर परस्पर विश्वासाचा मुद्दा आहे यात अडचण काहीच नाही. अत करणे मिळाली तर सर्व काही होऊन जाते."

"वाहवा ! खूप बोललात शिवाभाऊ ! असो पण आजकाल तर सहकारी शेतीविषयीहि गोष्टी चालतात ?'

"होय, चालतात तुम्हा मडळीची जशी इच्छा असेल त्याप्रमाणे शेती वाहू शकता. आजच्याप्रमाणे कुटुबाने आपली शेती अलग अलग करावी, जी कुटुबें एकत्र येऊ शकतात त्यानी सहकारी शेती करावी. आणि इच्छा असल्यास सर्व गाव मिळून सामूहिक शेती करावी माझा सल्ला आहे की सध्या तरी प्रत्येक परिवाराने अलग अलग शेती करावी. तरी पण एकाने दुसऱ्यास सर्वतोपरी मदत करावी आणि बी-बियाणे, रासायनिक औषधे आदीची व्यवस्था ग्रामसभेतर्फे व्हावी "

"ठीक आहे बरे, जमीन ग्रामसभेची झाल्यावर शेतसारा (वायदा) कसा दिला जाईल ?"

"प्रत्येक शेतकरी शेतसारा ग्रामसभेला देईल आणि ग्रामसभा सरकारला देईल सर्व गावाचे खाते एकच राहील."

"खाते एक झाले म्हणजे मोहनराव सीलिंगच्या कचाटयातून सुटतील. त्यांच्याजवळ जास्त जमीन आहे "

"अऽहृ तसे नाही. मीलिंगमधून निसटण्यासाठी खाने एक नाही केलें जात. मीलिंग तर लागेलच आपण लोक सरकारी धोरणाच्या काय मागे थोडेंच राहणार आहोत?"

"आणखी एक गोष्ट. जर जमीन ग्रामसभेची झाली तर आम्हाला खरेदी-विक्रीचा काय अधिकार राहील? लग्नादि समारंभ, श्राद्ध, तेरवी, व इतर प्रसंग आम्ही तर जमिनीच्या आधारावरच चालवतो. ते तसे काय जमेल?"

"तुम्ही मंडळी गावाच्या पुनर्रचनेसबंधीं विचार करीत आहात आणि शेती विकण्याच्या गोष्टी बोलता! आता प्रश्न असा करा की नवीन व्यवस्थेत जमीन विकणें कसे बंद होईल? जमीन विकायला भाग पाडणाऱ्या अशा प्रासंगिक अडचणीच तर शेतकऱ्याला बरबाद करीत आहेत. किती मोठमोठे शेतकरी जमीन विकता-विकता अगदी आपली सर्व जमीन विकून टाकतात व शेवटी त्याचा मुलाबाळांवर उपाशी मरायची पाळी येते असला अधिकार तुम्हाला पाहिजे काय?"

"तसे नाही पण समाजात राहावें लागतें तर काय करणार?"

"ठीक आहे, त्यासाठी गावचा एक ग्रामनिधि तयार करा जरूर पडेल तेव्हा त्यातून रक्कम घ्यावी आणि जेवढी रकम घ्याल त्यापेक्षा थोडी अधिक परत करावी. जमीन कशाला विकायची? ग्रामनिधि तयार करा, त्याची वाढ करा म्हणजे गावाचे काम चालत राहील"

"ही तर फारच चांगली गोष्ट होईल पण हा ग्रामनिधि तयार कसा करायचा?"

"फार सोपें काम आहे हें! प्रत्येक शेतकऱ्याने आपल्या उत्पन्नापैकी मणामागे एक शेर गावच्या मजिन्यात जमा करावा. बटाईदाराने (मक्तेदार) आपल्या हिस्सातून द्यावा तसेच प्रत्येक मजुराने ३० दिवसांच्या मजुरीतून एक दिवसाची मजुरी द्यावी. व्यापाऱ्याने आपल्या नफ्यापैकी जेवढा तो घरखर्चासाठी वापरतो त्याचा तिसावा हिस्सा द्यावा. नोकरी करणाऱ्याने तीस दिवसांपैकी एक दिवसाचे वेतन द्यावें. अशा तऱ्हेने वर्षाभरात हजारों

रुपयाचा निधि गोळा होईल. आणि तुम्ही जेवढा गोळा कराल त्याच्यावर सरकारकडून कर्जसुद्धा मिळू शकेल."

"आणि तेवढ्याने काम नाही भागले तर?"

"अरे बाबा, काम भागवण्याचा प्रयत्न करायला पाहिजे. लग्न-श्राद्ध आदि प्रसंगी सर्व पैसे खर्च कराल तर शेतीसाठी, उद्योग-धंद्यासाठी भांडवल कोठून येईल? आता भांडवलाचा उपयोग उत्पादन वाढीसाठी करा. इतक्यावरहि ग्रामनिधीने तुमचे काम भागले नाही तर ग्रामसभेच्या परवानगीने ग्रामसभेच्या एखाद्या सदस्याला जमीन विकू शकता. कायद्यात अशी सवलत ठेवलेली आहे. यामुळे होईल काय की गावची जमीन गावातच राहील व कोणत्याहि परिस्थितीत ती गावाच्याबाहेर जाणार नाही. हां, सरकार किंवा सहकारी पेढी यांच्याकडून कर्ज काढायचे असल्यास जमीन गहाण ठेवता येईल हे सर्व होऊ शकेल, पण जमीन विकण्याचा किंवा गहाण ठेवण्याचा प्रसंगच येणार नाही असा सर्वप्रथम प्रयत्न व्हायला पाहिजे."

"हे सर्व ठीक आहे, पण सावकार ग्रामसभेच्या जमिनीवर कर्ज देणार नाही. त्याला विश्वास कसा वाटेल?"

"तुमच्यावर विश्वास ठेवीत होता तर ग्रामसभेवर का नाही ठेवणार? मालकांनी ग्रामसभेवर विश्वास टाकला तर सावकारहि टाकील. जेव्हा त्याला समजेल की सरकारने ग्रामसभेला मान्यता दिली आहे त्या अर्थी तोहि मान्यता देईल. असे पहा की ग्रामसभेपेक्षा अधिक खात्री लायक असामी सावकाराला दुसरी कोण मिळणार?"

"ठीक आहे. ग्रामसभा बनली. आम्ही लोकांनी आपापल्या जमिनीचे कागद-पत्र तिला सोपवून दिले, आपल्या मिळकतीचा काही हिस्सा देऊन ग्रामनिधि बनविला, व जमिनीची विक्री होऊ दिली नाही, म्हणजे जमिनीमुळे होणाऱ्या झगडयापासून आमचा बचाव होईल, व गावचे भांडवलहि तयार होईल. आपले स्वतःचे भांडवल झाले म्हणजे पुष्कळ काम होईल. खरी गोष्ट अशी आहे की एकदा ग्रामसभा संगठित झाली आणि मोठ्या सद्भावनेने आणि प्रामाणिकपणाने काम करू लागले तर आम्ही

आमच्या गावामधे सुख व शांतीसाठी वाटेल त करू शकतो पण काय हो ? एवढें सर्व नवीन काम आपल्या आपसातील पद्धतीने होईल की काही लिखा-पढीहि करावी लागेल ?''

"प्रथम हें तर ठरवा की आतापर्यंत ज्या गोष्टी झाल्या त्या सर्वांना मजूर आहेत की नाहीत ? कोणाच्या मनात काही शंका असेल तर दूर करून घ्या आणि मोकळ्या मनाने 'हो' किंवा 'नाही' बोला. सर्वांनी अलग अलग स्वतंत्रपणे बोलावे स्त्रियांनी मुद्धा बोलावे"

"होय... .....होय........ होय ........"

' आता मी ग्रामदानाचे घोषणापत्र वाचतो मी थोडें थाडें सागेन, तुम्ही मागून बोला."

● ●

# ग्रामदानाचा संकल्प आणि घोषणापत्र : १० :

आम्ही........गाव........ ब्लॉक......पटवारी हलका न......
तहसील........जिल्हा........चे राहणार

पूज्य विनोबानी सुरू केलेल्या ग्रामदानी चळवळीचे विचार चांगल्या रीतीने समजून घेतल्यानतर आमच्या गावाचें ग्रामदान जाहीर करीत आहोत आणि त्यातील उद्देशाच्या पूर्तीसाठी --

१ आम्ही आमच्या शेतीलायक जमिनीचा विसावा हिस्सा आमच्या गावातील भूमिहीन परिवारासाठी ग्रामसभेला देत आहोत

२ आम्ही आमच्या जमिनीवरील मालकीचा अधिकार ग्रामसभेला समर्पित करीत आहोत उपरोक्त विसावा भाग काढून दिल्यानतर जी जमीन आमच्याजवळ राहील तिचा आम्ही व आमचे वारस उपभोग घेत राहू, ती जमीन आमच्या व आमच्या वारसाच्या समतीशिवाय कोणालाहि हस्तातरित केली जाऊ शकणार नाही. ग्रामदानात समर्पित केली गेलेली आमच्या गावची जमीन गहाण ठेवली जाऊ शकणार नाही किंवा विकली जाऊ शकणार नाही ग्रामसभेच्या अनुमतीने गावातल्या गावात विकली जाऊ शकेल व सरकारी किंवा सहकारी सस्थाच्याकडून घेतल्या जाणाऱ्या कर्जासाठी गहाण ठेवली जाऊ शकेल

३ आमच्या अधिकाराखालील जमिनीच्या उत्पन्नाचा चाळीसावा भाग (शेतमजुरा दिल्यानतर, तसेच पिकाचा हिस्सा वाटल्यानंतर) भांडवल-निर्मितीसाठी आम्ही ग्रामसभेला देत जाऊ आमच्यापैकी ज्यांच्याजवळ जमीन नाही, व ज्यांचे नगदी उत्पन्न आहे, ते आपल्या मासिक उत्पन्नाचा तिसावा भाग दरमहा ग्रामसभेला देत जातील या रीतीने जे भांडवल एकत्रित होईल त्याचा उपयोग गावातील अनाथाचा व निराश्रितांची

व्यवस्था, रोग्याच्या चिकित्सेची व्यवस्था, बेकारासाठी कामाची व्यवस्था कृषि-ग्रामोद्योगाची उन्नति, तसेच ग्राम-विकासाच्या अन्य कामासाठी केले जाईल.

४ गावच्या प्रत्येक परिवारातील एक-एक व्यक्ति घेऊन आम्ही ग्रामसभेचे सगठन करीत आहोत ती ग्रामसभा गावातील सर्व लोकाकडे लक्ष देईल. ग्रामसभेचे सचालन सर्वसमतीने किंवा सर्वानुमतीने* केले जाईल.

| क्रमाक | परिवाराच्या कर्त्या व्यक्तीचे नाव | परिवाराच्या एकूण जमिनीचा रकबा | भूमिहीनाला दिलेल्या जमिनीचा रकबा | हस्ताक्षर | तारीख |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

* सर्वसमतीचा अर्थ सगळ्याची समति असा आहे जेव्हा सर्व लोक एकमत होऊन एखादा निर्णय करतात तेव्हा तो सर्वसमतीचा मानला जाईल. सर्वानुमतीचा अर्थ आहे सर्वाची अनुमति किंवा निर्विरोध जेव्हा एखाद्या निर्णयाबाबत सर्व लोक एकमत होत नाहीत पण आपापले स्वतत्र विचार ठेवूनहि कोणी विरोध करीत नाहीत तो निर्णय सर्वानुमतीचा मानला जाईल

नोट — हस्ताक्षर करणाराची सख्या जास्त असेल तर या फॉर्मच्या पाठीमागेहि हस्ताक्षर करता येईल

"आजपासून तुम्ही गावाची एक नवीन व्यवस्था कायम करीत आहात एक नवा बधुभाव निर्माण करीत आहात आता जुन्या सर्व गोष्टी विसरून जा. ग्रामदानाचे घोषणापत्र बरोबरीच ग्राम मुक्तीचे (ग्राम स्वराज्याचे) घोषणापत्र आहे असे समजा. यानतर जे काही काम करीत जाल त्या वेळीं गावातील सर्व लोक आपले बांधव आहेत, शेजारी आहेत, या गोष्टीचा कधीहि विसर पडू देऊ नका. आता एकामागून एक सर्व [illegible] समक्षानी आपापले हस्ताक्षर करावे."

"उठण्यापूर्वी एका गोष्टीचा आणखी खुलासा करा. जमिनीचा विसावा हिस्सा कसा काढायचा ? त्यासाठी पटवारी (तलाठी) येईल काय ?"

"सध्या तर असे करा. प्रत्येक शेतकऱ्याने आपापल्या जमिनीतून काठीने मोजून तेवढा भाग भूमिहीनाला द्यावा. एवढी आपसातील वाटणी तावडतोब करून टाका. नंतर पटवारी येईल व वाकायदा हद्दी ठरवून देईल."

सभा सपता सपता अर्धी रात्र झाली. पण लोक इतके खुश होते की जणू काही एखादा खजिनाच हाती आला आहे चालता-चालता राजाराम म्हणाला "कोणी काही दिले नाही ! पण सर्वांनी मिळूनच मिळवले खूप अजब आहे हे दान !"

• •

# एकदिलाने विचार करा एकदिलाने काम करा

: ११ :

तळेगावमधे अनेक जातींचे लोक आहेत. गांव लहान आहे. म्हणून वयात आलेले सर्व स्त्री पुरुष ग्रामसभेचे सदस्य झाले. जर गांव मोठा असता तर प्रत्येक परिवारातील एकच मनुष्य सदस्य झाला असता. आता सध्या ग्रामसभा दर पंधरवड्याला, गांववाले ठरवितील तर दर एकादशीला मारुतीच्या मंदिरात किंवा शाळेत भरत जाईल. नंतर महिन्यातून एक दिवस भरली तरी चालेल. रोजच्या कामासाठी एक लहान समिति केली पाहिजे. ती बनविणे सोपे आहे. एक दिवस सायंकाळी ग्रामसभेच्या सर्व लोकांनी एकत्र बसावे आणि आपल्यामधून सात जणांची एक 'सेवक समिति' बनवावी. जसे आज होत आहे त्याप्रमाणे निवडणुकीची लढाई होऊ देऊ नये. सर्वसंमतीने प्रथम अध्यक्ष ('मुख्यसेवक' हे नाव अधिक चांगले) व मंत्री निवडावे. नंतर ज्यांच्यावर सर्व लोकांचा विश्वास असेल व जे आपला वेळ देऊन गावाची सेवा करण्यास तयार असतील अशा व्यक्तींची निवड करावी. हे सात मिळून ग्रामसभेची एक 'सेवक-समिति' होईल. याच समितीवर मुख्यत: संपूर्ण गावाची जबाबदारी राहील. समितीच्या लोकांमधे कामाची वाटणी अशा प्रकारे होऊ शकेल—

१ शांतता, एकता, श्रमदान व ग्राम निधि (अध्यक्ष)
२ शेती, भूमि सुधार
३ वृक्ष-संवर्धन, पशुपालन
४ स्वास्थ्य, सफाई, खत-निर्मिति
५ शिक्षण, सत्संग, मनोरंजन

६ खादी, ग्रामोद्योग

७ न्याय, सरकारी सहायता, इतर गावाशी संबंध

आपापल्या विभागाबरोबर ग्रामसभेचे जास्तीत जास्त लोक जोडले जातील असा प्रत्येक सेवकाने प्रयत्न करावा म्हणजे अशा रीतीने सात सेवकांबरोबर काम करणाऱ्या सात समित्या तयार होतील सेवक-समितीची बैठक दर आठवड्याला व्हावी दर पौर्णिमेला सायंकाळी दोन मैलांच्या घेऱ्यात येणाऱ्या सर्व ग्रामदानी गावांच्या सेवक-समित्यांची बैठक बोलवावी हिला 'पौर्णिमा-सभा' म्हणावे. यामुळे आपलेपणा वाढेल, एका गावची समस्या दुसऱ्या गावासमोर येईल व एकाचा अनुभव दुसऱ्याच्या उपयोगी पडेल

या सेवक-समितीचे व अध्यक्षाचे अगदी प्रथम व मूलगामी काम आहे गावाचे ऐक्य वाढवणे व टिकविणे गावच्या लोकात ग्रामभावना जेवढी मजबूत होईल तितक्याच झपाट्याने गावाचा विकास होईल. असे मानू नये की ग्रामदानाची घोषणा केल्यानेच केवळ गावातील सर्व झगडे व तणाव नाहीसे झाले आहेत आणि गाव एक होऊन गेले आहे. असे मानणे चूक आहे. मनुष्याचे मन मोठे चमत्कारिक आहे त्यात जुन्या गोष्टी फिरून फिरून उलटून येत राहतात म्हणून एकतेच्या प्रश्नाबाबत सावध राहिले पाहिजे. घोषणा झाल्यावरसुद्धा ऐक्याच्या विकासात कित्येक अडचणी येतील. त्या अडचणींची मुळे गावच्या जीवनात खोल रुजलेली असतात. उदाहरणार्थ— गरीब-श्रीमंत, जाती-जातीतील तणाव, स्वार्था-स्वार्थांच्या टक्करी, एका कुटुंबाचा दुसऱ्या कुटुंबाशी झगडा (बहुधा तो बापजाद्यांपासून चालत आलेला असतो), निवडणुकींची दलबंदी, गावातील राजनैतिक पक्षांचे गट, काही श्रीमंत किंवा शिक्षित लोकांचे स्वतःचे प्रभुत्व कायम ठेवण्यासाठी एकमेकांत झगडे लावीत राहणे, बाहेरच्या पुढाऱ्यांचा प्रभाव, दुसऱ्या विरोधी गावांचा प्रभाव (ज्यामुळे गावातील ऐक्य तोडण्याचे कुचक्र चालू असते), पोलीस, विकास-गट, जंगलविभाग आदींच्या कर्मचाऱ्यांच्या खटपटी-लटपटी व सरते शेवटी गावातल्या गावात ग्रामदानी व गैर-ग्रामदानी परिवारांतील तणाव

(गैर-ग्रामदानी परिवारातील मंडळी एकसारखा प्रयत्न करतात की ग्रामदानाचे काम पुढे जाऊ नये, वाढू नये), सरकारी विकास योजना व कायदा याच्यामुळे, किंवा अन्य संस्थाच्या कार्यामुळे बहुधा तणाव वाढतो असे सुद्धा आम्ही पाहिले आहे. कित्येक वेळा ग्रामदानानंतर लोकांच्या आकांक्षा वाढतात. ग्रामसभेला या सर्व गोष्टीकडे लक्ष द्यावे लागेल. ग्रामसभा कोठपर्यंत हे आपसातील तणाव व विरोध शांतिपूर्ण रीतीने नाहीसे करू शकते या गोष्टीवर तिची सफलता अवलंबून आहे. तसेच ती एकमताने कसे निर्णय घेऊ शकते व गावातील सामाजिक न्यायाच्या मूल्याचा विकास किती करू शकते यावरूनहि तिची सफलता मापली जाईल. जर एकतेची व समतेची भावना क्रमाक्रमाने वाढली नाही तर आर्थिक किंवा दुसरी विकासाची कामे क्वचितच टिकू शकतील. एकतेच्या विकासासाठी तीन गोष्टी विशेषरूपाने मदतरूप होतात

(१) सत्संग व सत्साहित्यद्वारा चित्तवृत्ति शुद्ध करणे व व उठवणे

(२) परस्पर सहकार वाढवतील आणि ज्यामुळे उत्पन्न सत वाढत जाईल अशी कामे उभारणे

(३) निर्दोष सामूहिक मनोरंजन करणे

गावच्या लोकांनी एकमेकांना ओळखण्याचा, आपला स्वा सामूहिक स्वार्थाशी जोडण्याचा व सर्वांच्या सम्मतीने योग्य काम व करावे या गोष्टीचा त्याचा अभ्यास कसा होऊ शकेल याचे सेवक-समिते सतत चिंतन करीत असले पाहिजे

एकतेचे अगदी प्रत्यक्ष व ठोस स्वरूप म्हणजे सामूहिक-निर्णय घे पण हे कठिण काम आहे. दुसऱ्याच्या आज्ञाचे पालन करणे आणि दुस कडून आज्ञाचे पालन करवून घेणे ही आमची जीवन-परंपरा पूर्वीपासू बनून गेलेली आहे. म्हणून दोन्हीहि आम्हाला स्वाभाविक वाटतात. ई द्वेष, मद व मत्सर यांनी आमचे डोके भरलेले असते. दुसऱ्यांच्या विषयीं आम्ही अगदी सहज संशय घेतो. दूर कोणाविषयीं आमच्या म संशय असतो. अशा परिस्थितीत ग्रामसभेचे काम सुरळीत चालू शक

नाही हे अगदी स्पष्ट आहे. आमच्या गावात जर आम्हाला लोकशक्ति उभी करायची आहे, जर आम्ही ग्रामसभेला लोकशाहीच्या प्राथमिक इकाईच्या रूपात विकसित करू चाहतो तर आम्हाला आमची विचारसरणी बदलली पाहिजे. आम्हाला दुसऱ्याची, कोणती का गोष्ट असेना, ती ऐकून घेण्याची, समजून घेण्याची, आणि त्यात जें काही तथ्य असेल ते स्वीकारण्याची सवय करायला पाहिजे. उत्तमातले उत्तम काम का असेना, पण त्याविषयी ग्रामसभेत तीव्र मतभेद असतील, तर' जोपर्यंत ती गोष्ट सर्वांना मान्य होत नाही तोपर्यंत ते सोडून दिले पाहिजे. ग्रामसभेचे काम ५१-४९ अशा बहुमत-अल्पमताच्या आधारावर चालू शकत नाही. उलट ही गोष्ट अशी आहे की त्यामुळे ग्रामसभाच नष्ट होऊन जाईल. म्हणून ग्रामसभेचे किंवा सेवक-समितीचे काम सर्वसमतीने किंवा सर्वानुमतीनेच चालले पाहिजे आणि याचा सर्वांना अभ्यास झाला पाहिजे. तसेच जो काही निर्णय होईल तो योग्य असावा, नि:पक्ष असावा व सर्वांना संतोषप्रद असावा.

सर्वांचें एकमत होऊ शकणार नाही हे समजनीय आहे. काही लोक ग्रामदानात सामीलसुद्धा होणार नाहीत. ग्रामदान व्हायला एवढ्या गोष्टी पुरेशा आहेत – (१) गावात जेवढे जमीनवाले असतील त्याच्यापैकी शेंकडा ७५ ग्रामदानात दाखल होतील. (२) गाववाल्याची आपल्या गावात जी जमीन असेल त्यापैकी शेंकडा ६० टक्के जमीन ग्रामदानात येईल. दुसऱ्या गावात गाववाल्याची जी जमीन असेल तिचा सध्या काही प्रश्न नाही. वरील फक्त दोनच शर्ती ग्रामदानासाठी आहेत. पण गावातील सर्व लोक त्यात सामील होतील असा प्रयत्न झाला पाहिजे.

काही लोक तावडतोब ग्रामदानात दाखल होणार नाहीत असे होणे शक्य आहे. तरीपण एकदा ग्रामदान जाहीर झाले म्हणजे तें तुटणार नाही. ग्रामदान झाल्यावर, कायद्याप्रमाणे ते लोकहि ग्रामसभेचे सदस्य होतील, जे ग्रामदानात दाखल झाले नसतील. म्हणून सुरवातीला काही दिवस काही अडचणी भले येवोत, पण जसजसे लोक ग्रामदानाची शक्ति व कार्यक्षमता समजू लागतील तसतसें मने साफ होत जातील व एक-

मताने निर्णय घेणे सोपें होत जाईल. पंचायतीप्रमाणे हार-जीतची निवडणूक होणार नाही व ग्रामसभेत गावातील सर्व लोक राहतील म्हणून वातावरणात कटुता राहणार नाही, विरोध राहणार नाही. तरीहि धीराने व कुशलतेने काम करावे लागेल.

आणखी एक गोष्ट ध्यानात घ्यायची आहे तो म्हणजे ग्राम-निधीची. पैशामुळे मनोमालिन्य निर्माण होणे सहज शक्य आहे. ग्राम-निधीचा संग्रह, त्याचा खर्च, व हिशोबादि याबाबतीत जेवढी खबरदारी घेतली जाईल तेवढी थोडीच आहे कारण सहकारी-समिति व अन्य संस्थामधे हिशोबाचा जो गडबडगुंडा होत आहे त्यामुळे लोकांचे मन फार साशंक झाले आहे. गुरवातीला जो जेवढें देईल तेवढें अविश्वास न दाखवता घ्यावे. लोक उत्साहपूर्वक 'ग्रामनिधि सुरू करा' असे म्हणतील तेव्हाच तो सुरु करावा. वादग्रस्त असे कोणतेच काम करू नये.

ग्रामसभा ही नव्या व्यवस्थेला संपूर्ण जबाबदार आहे अशा दृष्टीनेच आपण तिच्याकडे पहावे. तिची शक्ति सरकारी कायद्याची नाही तर लोकांचा विश्वास आणि सहकार ही आहे. गाव "राज्य" आहे, त्याचे पार्लमेन्ट व सरकारहि आहे. पण पक्ष (दल) नाही, निवडणूक नाही, अधिकारी नाही. आपले काम आपल्याच मताने व आपल्याच शक्तीने होणार आहे.

● ●

# खरेंच होईल का क्रांति ? : १२ :

त्या दिवशी अर्ध्या रात्रीपर्यंत जेव्हा गाववाले चर्चा करीत होते तेव्हा सखाराम तेथे हजर होता व गुपचुप बसून फक्त ऐकत होता तिसऱ्या दिवशीं रात्रीं जेव्हा तो भेटायला आला तेव्हा त्याच्या मनात कितीतरी मथन चालले होत ते कळले

खरोखरीच तो अगदी बेचैन झाला होता सखारामजवळ स्वत ची जमीन नाही तो केवळ मजूरी करतो दोनतीन एकर बटाईने करतो मेहनती आहे, प्रामाणिक आहे, शिकला सवरलेला नाही पण ईश्वराने त्याला स्वाभाविक अशी बुद्धि दिली आहे की कोणत्याहि गोष्टीचे मर्म तो घट्ट पकडू शकतो. आल्याबरोबर तो म्हणाला "भाऊसाहेब, खरोखरच तळेगाव बदलून गेला काय ?"

"का ? तुला काही शका आहे काय की लोकानी उत्साहाच्या भरात घोषणा केली पण ते ती पूर्ण करणार नाहीत ? '

"तसे काही नाही मला पूर्ण विश्वास आहे की तळेगांवचे लोक सर्व शर्ती पूर्ण करतील आणि त्या अगदी उत्साहाने पूर्ण करतील पण माझ्या मनात काही दुसऱ्याच गोष्टी आहेत '

' त्या कोणत्या ?'

"एक तर ही की विमावा हिस्सा या हिशाबान आपल्या गावात एकूण १८१ एकर जमीन एकत्र होईल ती किती भूमिहीन परिवाराना दता येईल ? गावात भूमिहीन असे एकूण दोनशे परिवार आहत. याशिवाय ज्याच्याजवळ फार थोडी जमीन आहे ते निराळे एक एक एकर जरी दिली तरी सर्वांना मिळणार नाही १८१ जणाना मिळेल व १९ बाकी राहतील त्यानाहि कधी तरी जमीन मिळेल काय ? आणि तुकडा तुकडा घेऊन आम्ही काय तुकडेसार नाही होणार ? तुम्हाला काय वाटत ? माझ्या मोहोल्ल्यातले काही मजूर तर असं म्हणू लागले आहत की विसाव्या

हिश्याच्या भुलावणीत आपण पडता कामा नये. भरपूर जमीन मिळाली तरच घ्यावी. काय कधी तरी मजुराचा दिवस नाही येणार ?"

"आणखी काय मुद्दे आहेत ? तेहि सांगून टाक."

"दुसरा मुद्दा असा की मालक आणि महाजन (सावकार) यांनी मजुरांना आपलेसे करावे या गोष्टीत ग्रामदान व ग्रामसभा यांची सफलता आहे असे मला वाटते. मजुरांनी आपल्या मनातील भीति व अविश्वास काढून टाकावा आणि तियांनीहि ग्रामसभेच्या योजनेत भागीदार व्हावे. होऊ शकेल हे ? सध्या एकमेकाच्या स्वार्थात खूप विरोध आहे. अविश्वास खूप खोल आहे. मनात दुरावा व संघर्षाशिवाय दुसर काही नाही. आजच्या जमान्याची हवाच तशी आहे."

"सगाराम, यात काही शंका नाही की अविश्वास खूप खोल आहे व आपसातील संबंध दिवसेदिवस बिघडूनच राहिले आहेत. तसा विचाराचा प्रचारच केला जात आहे. येथपर्यंत म्हटले जाते की संघर्षाशिवाय विकास होऊच शकत नाही."

"होय, असे म्हटले तर जाते आणि देश ज्या मार्गाने जात आहे त्यावरून पाहता या विषादापासून बचाव कसा करावा हे काही समजत नाही."

"पण एवढे तर सहज कबूल कराल की न्याय व सन्मानपूर्वक आपापसातला सहयोग संघर्षापेक्षा सर्व दृष्टीने चांगला आहे ?"

"हे कोण नाही कबूल करणार ?"

"तर मग न्याय व प्रतिष्ठापूर्वक जमीन, पैसा आणि श्रम यांच्यामध्ये

"मुख्य गोष्ट तर हीच आहे "

"ग्रामसभेला हू करता येईल ?"

"एक गोष्ट पक्की आहे सखाराम, की आज जी परिस्थिति आहे तिला सर्व कटाळले आहेत मालक, सावकार व मजूर तिघानाहि स्पष्ट दिसत आहे की ते ज्या मार्गाने आजपर्यंत चालत आले आहेत त्या मार्गाने तसेच पुढे चालण्याने त्रास वाढेल, कमी होणार नाही ज्या झपाट्याने ग्राम जीवन तुटून राहिले आहे ते पाहून सर्वच अगदी घाबरून गेले आहेत अभाव व असुरक्षितता या साप्रतच्या परिस्थितीतून लोक बाहेर निघू चाहत आहेत पण बाहेर पडण्याचा मार्गच सुचत नाही "

"ही गोष्ट पुष्कळशी खरी आहे कोणालाहि सुख आणि शांति नाही लोक समजून चुकले आहेत की जुना ढग आता चालणार नाही काही नवा मार्ग शोधलाच पाहिजे '

"मुक्तीची जी घोषणा झाली ती मुळाला हात घालणारा नवीन मार्ग आहे असे तुला नाही वाटत ?"

"मार्ग तर नवीन आहेच, व्यवस्थाहि अगदी नवी आहे, पण पूर्व-सस्कार व स्वार्थ काही चालू देतील तेव्हा ना!''

"स्वार्थ सोडण्याच्या फारशा गोष्टी आम्ही सांगतच नाही मुळी आमचे तर असे म्हणणे आहे की स्वार्थासाठीसुद्धा गावाची नवीन सामूहिक व्यवस्था करणे जरूर आहे कारण स्वार्थास्वार्थात टक्कर होईल तर कोणाचा स्वार्थ साधेल, कोणाचा साधणार नाही, त्याचे काय ? सभव मात्र असा दिसतो की टक्करीत कोणाचाहि स्वार्थ न साधता नाश मात्र सर्वांचा होईल"

"तुम्ही ही जी गोष्ट सांगता आहात ती ल्क्षात तर येते पण..."

"पण काय ? जर ही गोष्ट निश्चित आहे की जमीन, पुजी आणि श्रम एकत्र आल्यानेच उत्पादन होते आणि त्यानेच आमचे जीवन चालते तर हे का नाही समजावून सांगता येणार की ज्यांच्याजवळ जे आहे ते प्रत्येकाने एके ठिकाणी आणल्यानेच जीवन टिकेल ? ही तिन्ही तत्वे

एकत्र आणता येतील – त्याचा मेळ जमेल – अशी काही योजना बनवा"

"अगदी खरे ! माणसात जर काही बुद्धि अ त्याला समजायला पाहिजे. पण समजेल तेव्हा ना !

"होय. मनुष्य दोन तऱ्हेने समजू शकतो, वि च्या दबावानेहि. तळेगावचे लोक आजपर्यंत आपस भांडत होते. सगळे एकमेकांचे शत्रु होते पण समज आतापर्यंत आपण खूप भांडून चुकलो – येथपर्यंत घोषणाहि करून टाकली ! विचार तर करा, कोणी किंवा मूठभर दाणे तरी देतो ? कोणी आपला माल ही गोष्ट कोणाच्या स्वप्नात तरी आली असतं लोकांची बुद्धि कशी जागृत झाली ? आमच्या सम लढून लढून थकून गेले होते म्हणून ?"

"दोन्हीमुळे"

"तर मग काय याच्या पुढची गोष्ट नाही स एका गावाला समजलें तर दुसरा गांव का नाही समजणार ? कोणताहि विचार जेव्हा लोकांच्या समस्यांशी जोडून पुढे येतो तेव्हा तो एकदम चित्तात ठसून जातो."

"गोष्ट बरोबर तर वाटते."

"आणखी असे पहा. जमीनवाल्यांनी ग्रामसभेला आपला मालकी हक्क दिला, भूमिहीनांना आपल्या जमिनीचा विसावा हिस्सा दिला, व ग्राम-निधीत मनामागे एक किलो धान्य दिले. व्यापाऱ्यांनी नफ्याचा तिसावा भाग दिला, मजूरांनी एक दिवसाची मजूरी दिली. एवढे सगळे करून हे सर्व लोक जेव्हा एकत्र ग्रामसभेत बसतील आणि एकूण गांवाच्या विकासाबद्दल विचार करू लागतील तेव्हा प्रथम कशाचा विचार करतील ? या गोष्टीचा विचार नाही करणार काय की पहिल्या प्रथम गांवातील प्रत्येक माणसाला बारा महिने तीस दिवस, रोज दोन्ही वेळेला पोटभर अन्न मिळाले पाहिजे आणि शरीर झाकायला वस्त्र मिळाले पाहिजे ?

मालक ग्रामसभेत तुमच्यासमोर म्हणू शकेल काय की मजुरासाठी अशी व्यवस्था व्हायला नको ?"

"असे कसे म्हणेल ?"

"आणि ग्रामसभा मालकाना सांगेल की मजूरी जास्त देता यावी म्हणून जमिनीचे उत्पादन अधिक वाढविले पाहिजे त्यासाठी चागलें बी-बियाणे, रासायनिक औषधें, यांत्रिक औजार वगैरेची व्यवस्था स्वत ग्रामसभा करील सावकाराना सांगेल की ग्राम-निधीत आपल्याजवळचे भाडवल मिळवा, आणि त्या सर्व रकमेवर गावात नवीन धंदा उभा करा, व्यापार-उद्योग चालवा, स्वत च्या भाडवली रकमेवर योग्य असेल तितके व्याज घ्या, आणि गावकरी लोकाना रोजी-रोटीला लावा. तुम्ही लोक धन कमावण्याची कला उत्तम रीतीने जाणता म्हणून हें काम तुम्हालाच करावे लागेल मजुरांना म्हणेल की आता काम मेहनतीने व प्रामाणिकपणाने करायला पाहिजे, गाव आपले समजले पाहिजे, दारू वगैरे नशाबाजीत प्राप्ति दवडता कामा नये, काम नसेल त्या फावल्या वेळात घरगुती उद्योग चालवले पाहिजेत व कमाईत भर टाकली पाहिजे असा पद्धतीने काम झालें तर अविश्वासाच्या भिंती हलके-हलके ढासळू लागतील असे नाही तुम्हाला वाटत ? मग मालक मजूर व सावकार याना सुचणार नाही काय की सर्व मिळून शेती व्हावी, सर्व मिळून उद्योग-धंदा चालावा, झगडे होऊ नयेत, व्यसन मुक्त होऊन कमाई वाढावी, गावातली आमदानी गांवातच राहावी, आणि सर्वांना ज्यादा हिस्सा मिळावा ? मग गावच्या जमिनीची व्यवस्था सर्व लोक मिळून शेत-मशागतीची सोय पाहून करतील. शेती खूप होईल — अन्न-धान्याचें उत्पादन वाढेल — तुमचा एक गट, आणि आमचे पक्षीत गट असा भेद राहणार नाही मालक स्वतःनीने असे बघू देतील.

परिवार जरीहि अलग अलग काम करत पण संपूर्ण गावाची योजना एकत्र मिळून आखावी. त्यामुळे सर्वांचा स्वार्थ साधला जाईल. आमदानानंतर लोक स्वार्थाकडे निराळ्या दृष्टीने पाहू लागतील. आजच्या- . प्रत्येकाने आपला स्वार्थ जर अलग अलग राखला तर किती

लोकांचा स्वार्थ साधला जाईल? बहुतांश परिवाराची शक्ति नष्टप्राय झालेली आहे. ते आता आपल्या स्वतःच्या भरवशावर जीवनाचा लढा लढू शकत नाहीत. खरे आहे की नाही?"

"होय, खरें आहे. पण भाऊसाहेब ग्रामसभेने जशा तऱ्हेने पुढे पावलें टाकणे सोपें काम नाही."

"सोपें नाही हें खरे. पण एक पाऊल पुढे टाकल्यानंतर असंभव कसे मानावे? हां, त्यासाठी सेवक-समितीला व ग्रामसभेला एकसारखें मार्गदर्शन व शिक्षण मिळत गेलें पाहिजे. म्हणजे गावची व्यवस्थाहि बदलेल आणि लोकांची डोकी व मनें बदलून साफ होतील. आज लोकांची डोकी व मन बिलकुल उलटी झाली आहेत, त्यात शिक्षणानेच बदल होऊ शकेल. दुसरा काही इलाज नाही."

"कशा प्रकारचे शिक्षण दिले जाईल?"

"तुला माहीत आहेच, सर्व पक्षांनी मान्य केले आहे की देशात लोकशाही व समाजवाद चालला पाहिजे. ग्रामसभेला व तिच्या सेवक-समितीला वारंवार शिबिरें भरवून दाखवून द्यावे लागेल की ग्रामसभा बनल्यानंतर 'सर्वांच्या लोकशाहीचें' गावाचें स्वरूप कसं राहील आणि सर्व जमीन गावाच्या मालकीची झाल्यावर सरकारच्या सध्याच्या समाजवादाहून भिन्न असा 'समाजाचा समाजवाद' कसा पुढे जाऊ शकेल? बरोबर आहे की नाही?"

"बरोबरच नव्हे तर आवश्यकहि आहे. आपसांत, जर पुष्कळशी गावे या पद्धतीचा अंगीकार करतील तर सर्व देशाची हवा झपाट्याने बदलायला लागेल."

"अगदी खरें आहे. शेजारच्या गावापासून अलग राहून एखादें गाव 'स्वर्ग' बनू शकत नाही. म्हणूनच तर सर्व देशभर ग्रामदानाचें तुफान उठविण्याचा प्रयत्न होत आहे, हें तू ऐकले असेल. हैं हा की शेंकडो-हजारों गावांनी तावडतोब मुक्तीची घोषणा करावी. आजच्या समाज-अज्ञान-अन्यायाविरुद्ध बंड उभारावें म्हणजे क्रांति होऊन गावोगावची

सुप्त शक्ति जागृत होऊन जाईल आणि त्याबरोबरच कोणाचा विरोधहि होऊ नये व कोणाशी संघर्षहि होऊ नये "

"संघर्षाची गोष्ट मनातून निघून जाणे सोपे नाही संघर्षाचा प्रचार-हि खूप होत आहे "

"त्याचें कारण असं आहे की लोक आज आवेशाने बोलतात, शांत विवेकाने बोलत नाहीत जर विवेकाने गोष्टी झाल्या असल्या तर हे समजायला कठिण नव्हते की तुमच्या गावातील २०० भूमिहीन परिवार ६९५ भूमिवाल्या परिवारांबरोबर संघर्ष कसा करू शकतील ? हीच परिस्थिति जवळ-जवळ प्रत्येक गावात आहे काही म्हटलें तरी संख्येमधे-सुद्धा काही तरी सामर्थ्य असतें की नाही ? शिवाय देश तुम्हाला संघर्ष करायला मोकळीक देईल ? संघर्ष करू चाहाल तरी करू शकणार नाही शिवाय या गोष्टीचाहि विचार करायला हवा की संघर्ष करून मिळवाल काय ?"

पळवून लावणार ? त्याचें काय करणार ? त्यानाहि जमीन द्यायची असली तर दर परिवाराला ६ एकराच्या ऐवजी पावणे पाच एकर जमीन सुद्धा मिळणार नाही. म्हणजे माणशी एक एकर सुद्धा येणार नाही. मग अशा रीतीने हिशोब करून योग्य वाटणी होईल कशी ? गावातील संघर्षाचा अर्थ होईल भयंकर कुतरओढ. तलाठ्या (पटवारी) मार्फत मोजून जमिनीची वाटणी होईल असे तुला वाटते ? वाटणी कोण करील ? हे पहा की देशात जेवढे राजकीय पक्ष आहेत ते सर्व जमिनीच्या 'सीलिंग'-च्या गोष्टी करीत आहेत. कोणता पक्ष जमिनीची मालकीच मिटविण्याची गोष्ट करतो आहे ? जर जमिनीची मालकीच मिटत असेल आणि पुढचा मार्ग साफ होत असेल तर ते फक्त ग्रामदानातच. आणि जेंव्हा मालक किंवा त्याचा वारस पाहील की ग्रामसभा सर्वांच्याच भल्याचा विचार करीत आहे आणि उद्या काय होईल याबद्दलची भीति उरलेली नाही असे त्याला वाटेल तेंव्हा त्याची मगरमिठी ढिली होईल आणि मग त्याचे लक्ष शेता-वरून उठून शेतीकडे जाईल. ते गावापासून अलग राहू शकणार नाहीत व राहू इच्छिणारहि नाहीत मग उरलेल्या भूमिहीनाना सहज रीतीने जमीन मिळेल आजच्याप्रमाणे विसावा हिस्सा या जमिनीची अशी व्यवस्था होऊन जाईल की शेतीबरोबर उद्योग-धद्याना जोडून सर्वांना काम मिळेल."

"मालकीच्या संबधाने तुम्ही चांगलें सांगितलें. त्यावरून सर्व मुद्दा नीट लक्षात आला. पण मग जमिनीनंतर मोठमोठ्या कारखान्यांचाहि नंबर लागणार आहे काय?"

"नाही तर दुसरा कोणाचा ? चळवळ मालकी नाहीशी करण्याची आहे — मालकाला नव्हे. जेवढ्या आणि ज्या प्रकारच्या म्हणून मालकी आहेत त्या सर्व समाप्तच व्हावयाच्या आहेत."

"असे समजून चला की ग्रामसभा तुम्हाला समनेच्या आधारावर सन्मानाचें स्थान देत आहे. असें सन्मानाचें स्थान न आजचा समाज तुम्हाला देत आहे, न सरकार देत आहे. शाळा काय, पंचायत काय, किंवा सहकारी समित्या काय कोणत्याहि संस्थेच्या नियमनात किंवा संचालनात तुम्हाला आज समतेचें स्थान नाही तें फक्त ग्रामधर्मातच आहे. आजपर्यंत मालक किंवा

महाजन (सावकार) आपल्या स्वार्थाच्या पलीकडे गावाची गोष्टच लक्षात घेत नसत पण आता ग्रामसभा त्याच्या स्वार्थाला गावाच्या स्वार्थावरोबर जोडून देईल, आणि त्याचप्रमाणे तुमच्या स्वार्थालाहि गावावरोबर जोडून देईल. याचाच अर्थ गावाचें सामूहिक हित होईल. अलग अलग संकुचित स्वार्थ राहणार नाही. जमिनीचा विसावा हिस्सा याचा अर्थ तुम्ही असा समजा की गावच्या मालकानी मालकी हक्क सोडून आणि प्रतीकरूपाने विसावा हिस्सा जमीन प्रत्यक्ष देऊन अशी घोषणा केली आहे की गावातील भूमिहीन व गरीब लोकाची जबाबदारी आता आमच्यावर आहे "

"तुम्ही ज्या रीतीने समजावून सांगितले आहे तसे समजावणार कोण ? लोक समजावीत नाहीत, भिववतात किंवा भडकवतात !"

"समजावतील कशाला ? जे लोक तुमच्यामधे येतात त्यांना तुमची बुद्धि नको, मत पाहिजे, व्होट पाहिजे जर तुम्हाला बुद्धि आली तर मग तुम्ही दुसऱ्यावर कशाला विसबून राहाल, स्वत विचार कराल व आपसात मिळून मिसळून काम कराल. म्हणून सखाराम, लक्षात ठेव, सघर्ष सर्वनाशाकडे नेणारा रस्ता आहे त्याचप्रमाणे जे लोक सरकारी कायद्याच्या बाता मारतात त्याच्या हें लक्षात येत नाही की कायद्याने कदाचित तुम्हाला थोडीशी जमीन मिळूनहि जाईल – पूर्ण तर कधी मिळायचीच नाही – पण कायदा काय एकमेकाचीं अतःकरणें जोडू शकेल ? आणि जर अतःकरणे जोडलीं गेली नाहीत तर गावातील कटुतेच्या व वैमनस्याच्या आगीत जळून खाक होण्यापासून सरकार तुमचा बचाव करू शकेल ?"

' जर ग्रामसभा मजबूत झाली तर ती चोरबाजार वगैरे सुद्धा रोकू शकेल, नाही का ?''

''का नाही रोकणार ? व्यापारी ग्रामसभेचा सदस्य राहीलच, त्याच्यावर ग्रामसभा अंकुश का नाही राखू शकणार ? आणखी काही काळाने जेव्हा विकास-खंडात ग्रामदानी गावाचे संगठन होईल तेव्हा आपला धान्य-बाजार होऊ शकतो, आपली बँक व आपल्याच वखारी होऊ शकतात मग शेतकऱ्याला स्वस्त विकून महाग विकत घ्यावे लागणार नाही महागाई व चोर-बाजार रोकण्याचे हे मार्ग आहेत गावचे एक खात झाल्यामुळे कर्मचाऱ्याचा भ्रष्टाचार मुळातच नष्ट होऊन जाईल. ग्रामसभेची आपली न्यायपंचायत झाली म्हणजे पोलीस व कोर्टकचेरीच्या भ्रष्टाचारापासून सुटका होईल अशा रीतीने जनतेच्या हिताचे रक्षण करण्याचे वातावरण तयार होईल ग्रामसभेला पंचायतीपेक्षा काही अधिक अधिकार राहतील पण ती पंचायतीच्या निवडणुकी व इतर झंझटीपासून सुरक्षित राहील बस, आता ग्रामसभा बनविण्याच्या कामाला लागा कसे !''

# गरीबीविरुद्ध मोर्चा : १३ :

जर सखारामने आपली भक्ति-शक्ति ग्रामसभेला दिली तर त्याच्या समस्याकडे ग्रामसभेला डोळे-झाक करणे संभवनीय नाही. आणि त्याची समस्या तरी काय आहे ? गरीबी. गरीबी त्याचीच काय सान्या देशाची समस्या आहे. म्हणून जेव्हा ग्रामसभा एकत्र येऊन गावच्या समस्यावर विचार करू लागेल तेव्हा आपल्या गावात किती बेकार आहेत व किती लाचार आहेत हे पाहून ती बेचैन होईल गरीब व गरिबीला पाहण्याची आम्हाला इतकी सवय होऊन गेली आहे की बहुधा आमचे लक्ष तिकडे जातच नाही. जणू काही आम्ही त्याचा स्वीकारच केला आहे असे वाटते. पण आता ग्रामसभेपुढे 'अंतिम व्यक्तीचे' चित्र उभे राहील. ही अंतिम व्यक्ति काय खाते, काय नेसते, कोठे राहते या सर्वांबाबत तिला विचार करावा लागेल. गरिबीच्या विरुद्ध लढा काढून सुरू करायचा हे ठरविणे ग्रामसभेला सोपे नाही इतके निश्चित की जेथे सरकारची विकास-योजना वरून सुरू होते, ग्रामसभेची विकास-योजना खालून सुरू होईल. हे अंतरहि काही सामान्य नाही. फार मोठे आहे अगदी मुळाशी हात घालणारे आहे.

गरीबी तर प्रत्येक ठिकाणी आहे पण भिन्न भिन्न परिस्थितीच्या गावात तिचे स्वरूप एकच नाही एका आदिवासी गावाचे ग्रामदान झाले. ग्रामसभेची बैठक झाली पहिल्या बैठकीत प्रश्न छेडला गेला की जंगलचा अमलदार रोज एक आणा घेतो आणि पोलीसचा शिपायी वाटेल तेव्हा कोणालाहि पकडून ठाण्यावर घेऊन जातो व काही घेतल्याशिवाय सोडीतच नाही. आता यापासून मुक्ति कशी मिळवावी ? गावात बेहद गरीबी तर होतीच, तरीहि सरकारी माणसाकडून जे दमन आणि शोषण होत होते ते या गरिबांना फार मग्न होते.

दुसर एक गाव आहे ल्हान ल्हान शेतकरी. सर्वांजवळ थोडी थोडी जमीन थोडे फार भात (धान), गहू, ऊस इत्यादि पिकें काढतात. तसे पाऊन-पीऊन सुखी पण गरीब नाहीत असे नाही म्हणता येणार. ग्रामदानानतर ग्रामसभेची जेव्हा पहिली बैठक झाली तेव्हा प्रश्न आला की ऊस गाळण्यासाठी गावाला जर यांत्रिक चरक (क्शर) मिळाला तर गूळ करण्याचे काम लोकर संपेल व गव्हाच्या मशागतीला पुरेसा वेळ व शक्ति लावता येईल

एक तिसर गाव मध्यमवर्गीय लोकाच गावामध्ये हिंदु-मुसलमान, शेतकरी-व्यापारी, किसान-मजूर सर्व आहेत. या गावच्या पहिल्याच बैठकीत अशी मागणी आली की 'अबर चर्खा' मिळाला पाहिजे बहुतांश मध्यम वर्गीय परिवार आतून अगदी पोखरले गेलेले आहेत शेतीची आमद मर्यादित झाली आहे स्त्रियाना काही खास काम नाही अशा परिस्थितीत अबर चर्ख्याची मागणी स्वाभाविक होती म्हणून प्रत्येक गावाला गरिबीच्या विरुद्ध लढा देण्याचा एक तयार साचेबद नमूना लागू होऊ शकत नाही परिस्थितीला अनुसरून योजना बदलेल व पुष्कळ विचार केल्यानतर निर्णय करावा लागेल की गावात विकासाची सुरुवात कोठून व कशी करावी लक्षात ठेवण्यासारखी महत्त्वाची गोष्ट ही की योजना अशी असावी की गावातील प्रत्येक माणसाला योजनेतील आपले स्थान स्पष्ट दिसावे व तिचा लाभ काही थोड्या व्यक्तीपर्यंत सीमित न राहता 'अति व्यक्तीपर्यंत पोहोचावा

जास्त फायदा उठविण्याच्या लोभाची गावात स्पर्धा सुरू होते आणि गावची एकता तुटून जाते बाहेरच्या मदतीबाबतची वेळ, क्रम, मर्यादा व प्रकार या सर्वांबाबत सावधानता ठेवणे जरूर आहे.

दुसरी गोष्ट ही. आमच्या चित्तावर गरीबीची अशी काही छाप पडली आहे की आम्ही अधिकतर तात्कालीक मदतीचे असे कार्यक्रम घुडाळीत राहतो हेतु हा की गरीबाना चार पैसे तावडतोब मिळावेत अडचणीच्या वेळी मदत मिळणे आवश्यक आहे पण आमच्या योजनमुळे गरीबीविरुद्ध लढण्याची व ती कायमची नाहीशी करण्याची शक्ति तयार होत आहे किंवा नाही इकडेहि लक्ष देणे जरूर आहे आतापर्यंत सेवेच्या नावावर जी जी कामे झाली त्यानी थोडीफार मदत जरूर मिळाली. पण मुळातली आन्तरिक शक्ति कमावली गेली नाही आता या दोन्ही चुका होऊ द्यायच्या नाहीत

पायाभूत आंतरिक शक्ति केवळ आर्थिक कार्यक्रमाने कमावली जाऊ शकत नाही सरजामशाही (सामतवाद) विदेशी शासन आणि स्वराज्य प्राप्तीनंतरच्या चुकीच्या विकासनीतीमुळे, अन्न मिळत नाही किंवा कपडा मिळत नाही एवढीच केवळ अभावाची आमची गरीबी राहिली नाही आमची गरीबी भाडवलाची आहे, कारागिरीची आहे, नवीन साधन सामग्रीची आहे, बुद्धीची आहे आणि चारित्र्याची सुद्धा अशा दृष्टीने आमची <u>गरीबी समग्र</u> आहे म्हणून जी काही योजना बनविली जाईल ती समग्र असली पाहिजे म्हणजे याचा अर्थ त्या योजनेने जीवनाच्या प्रत्येक अंगाच्या विकासाकडे लक्ष दिले पाहिजे यातून दोन गोष्टी निघतात. एक म्हणजे केवळ आर्थिक कार्यक्रमामुळे गावच्या मूळ समस्या सुटू शकत नाहीत मूळ समस्या कोणत्या आहेत ? आपसातील फूट आणि विषमता

समाज-परिवर्तनाच्या दृष्टीने, ग्रामीण-समाज भेद व विरोध याच्या वर उठला पाहिजे ही गोष्ट आवश्यक आहे त्यात समन्वय (भावनात्मक एकता) साधला पाहिजे, तसच प्रचलित विषमता मिटली पाहिजे. समन्वय साधणे पुष्कळसा विषमता मिटण्यावर अवलंबून आहे म्हणून जर आम्ही गरीब व गरीबी यावरच केवळ जोर देऊन योजना बनवीत जाऊ तर

एकता व विषमता हे दोन्ही प्रश्न हातचे निसटून जातील. आणि समाजाची इमारत आम्ही ज्या नवीन पायावर उभारू इच्छितो तो पायवाच उखडला जाईल. म्हणून योजनेची समग्रता व ती लागू करण्याची पद्धति व प्रक्रिया याच्याकडे सर्वांत अधिक लक्ष देणे आवश्यक आहे.

समग्रतेचा एवढाच अर्थ नाही की शेती असावी, उद्योग असावा, त्याबरोबर रामायणादि वाचले जावे व थोडेंफार नाच-गाणेहि होत राहावें. समग्रतेचा खरा अर्थ असा आहे की जो काही कार्यक्रम चालविला जाईल त्याच्या प्रत्येक अंगाकडे लक्ष दिले जावें, त्यामुळे जीविकेबरोबर जीवनहि प्राप्त व्हावें, त्यापासून भौतिक सामग्री निर्माण होत असेल तर त्याबरोबर हृदयाची आतंरिक सामग्रीहि निर्माण व्हावी. आम्ही अभावावर विजय मिळवीत असलो तरी त्याचबरोबर आम्ही स्वभावाच्या विकृतीवर-हि विजय मिळवावा. या सर्व गोष्टी जमल्या पाहिजेत. या गोष्टी तेव्हाच संभवनीय होतील जेव्हा आम्ही केवळ सस्था उभ्या करून काही साधन-सामग्री एकत्रित करण्यावरच संतोष न मानता सान्या पद्धतीला व प्रक्रियेला शैक्षणिक स्वरूप देऊ. म्हणजे मनुष्य काम तर करीलच पण त्याबरोबरच त्या कामाचें वैज्ञानिक पद्धतीने शिक्षणहि घेईल व असे शिक्षण घेतल्यानंतर आपल्यात काही गुणाचा विकास झाला आहे याचा अनुभवहि घेईल. पद्धति शिक्षणाची असेल तर आमदनी वाढेलच पण त्याच बरोबर गुणात्मक परिवर्तनहि होईल.

प्राय: असें होतें की आम्ही खूप लांबरुंद योजना बनवतो पण गावात साधन सामग्री काय आहे, कारागिरी कितपत आहे, चारित्र्य कसे व किंमत आहे या गोष्टींकडे लक्ष द्यायला विसरून जातो. याचा परिणाम असा होतो की योजना आपल्या जागीं राहून जाते, गाव आपल्या जागीं राहतो आणि काही दिवसांनी जनता निराशेला व अविश्वासाला बळी पडते. पण योजना सामान्य परिवाराच्याहि आवाक्यात असेल तर फळ तावडतोब दिसू लागते व उत्साह वाढू लागतो.

सामूहिकतेच्या उत्साहात आम्ही परिवाराची उपेक्षा करून पुढे जाण्याचा प्रयत्न करू तर मालचे परिवार सुटून जातील व योजना

'मोठ्याची' होऊन बसेल ही गोष्ट निश्चित आहे म्हणून सुरवातीला सामूहिकतेवर जोर देणे उपयुक्त होणार नाही यासाठी प्रयत्न असा व्हायला पाहिजे की प्रत्येक परिवार, जेथे आहे, तेथून काही तरी पुढे जाण्याची धडपड करतो आहे, व हलके हलके एका परिवाराचे दुसऱ्या परिवाराशी सहकार करण्याचे क्षेत्र वाढते आहे

आज गावाची जी परिस्थिति आहे त्या परिस्थितीप्रमाणे विकासाच्या काही पायऱ्या अशा राहू शकतील –

१ आज ज्याला ज्या प्रकारचा जसा काही आहार मिळत आहे तसाच बारा महिने, तीस दिवस रोज दोन्ही वेळेला मिळावा कपड्यासाठी धान्य विकावे लागू नये

२ खाण्यासाठी व कपड्यासाठी कर्ज काढाव लागू नये धान्य हगामात स्वस्त विकून मग पुढे महाग खरेदी कराव लागते, या शोषणा पासून मुक्ति मिळावी गावातील कच्च्या मालाचा पक्का माल बनविण्याचा काही उद्योग गावात सुरू करावा

३ खर्चापेक्षा कमाई अधिक असावी म्हणजे काही पुंजी जमू शकेल ती अधिक कमाईसाठी उपयोगात आणता यावी गावाने व्यापार, व्याज इत्यादि आपल्या नियन्त्रणाखाली घ्यावे

४ जीवन स्तर उच्च उठविण्याचा प्रयत्न व्हावा

योग्य वेळ येण्याच्या आधीच जीवनमान सुधारण्याविषयी गोष्टी सुरू होतात, तेव्हा गावातील कमजोर व गरीब लोक याच्याकडे दुर्लक्ष होऊन ते अलग पडतात, आणि गाव पैशाच्या मोहामुळे बाजारच्या भावऱ्यात सापडतो बाजार तर आपल्या हातात नसता म्हणून कोणत्या वेळी कोणत्या वस्तूचा काय भाव होईल याचा नेम नसतो त्यामुळे गावातील नवीन सुरू झालेला उद्योग सरकारी व अन्य संस्थांची मदत असूनहि बसतात म्हणून आपले गाव व आसपासचा बाजार विकसित करणे याचा प्रथम प्रयत्न झाला पाहिजे

जर आम्ही सर्व दृष्टीने विचार केला तर शेतीला जोडून घराघरात पोहोचू शकेल, ज्याला भांडवल कमी लागेल, व जो गाववाल्यांच्या आवाक्यात येऊं शकेल असा खादीपेक्षा दुसरा चांगला उद्योग आढळून येत नाही खादीमुळे लोक घरातल्या घरात फावल्या वेळेचा उद्योग मिळवू शकतात ज्याना जरूर आहे अशाना, रुपया दीड रुपया रोजींचा पूर्ण वेळ काम करण्याचा, अंबर चरख्याचा उद्योग मिळू शकतो जर आमच्या गावात या महागाईच्या दिवसातहि कित्येक लोक मासिक ८-१० रुपयाच्या आमदनीवर जगत आहेत — समजत नाहीं कसे जगतात ते — अशा वेळीं त्याना ३५-४० रुपये आमदनी स्वप्नवत् वाटली तरी *खरोखर ही आवाक्यातली गोष्ट आहे*

हल्ली खादीचें काम खादीच्या संस्था करतात कातणारी बाई खादी भांडारातून रुई किंवा पेळू आणून घरी सूत कातते व खादी-भांडारात ते विकते किंवा त्याच्या बदल्यात खादी घेते विणाईचा खर्च सरकार देते म्हणून अशा रीतीने बदल्यात घेतलेली खादी स्वस्त पडत. पण जर आपल्या शेतातील कापूस व आपल्या घरचें सूत असेल, व विणाई गावातल्या गावात किंवा आसपास होत असेल तर गावाला एकंदरीत कपडा फुकटच पडला असे समजले पाहिजे हीच खरीखुरी 'गावची खादी' *आहे या खादीपासूनच ग्रामसभेने आपल्या गावच्या औद्योगीकरणाला* सुरुवात करायला पाहिजे.

एखाद्या गावात पाचशेंची लोकसंख्या असून दर माणशी सरासरी वर्षाकाठीं २० रुपये कपड्यासाठी खर्च होत असतील असे धरले तर एकूण दहा हजार रुपये कपड्यापायीं सध्या गांवाबाहेर जातात असा याचा अर्थ होतो खादीचा उद्योग एवढी मोठी रक्कम गावाबाहेर जाण्याचें रोकू शकतो सामान्यपणे हा पैसा शेतकऱ्याजवळ कोठून येतो ? शेतकरी धान्य विकून पैसा करतो व कापड विकत घेतो, मजूर मजूरी करून पैसा मिळवतो व पोटाला चिमटा घेऊन कापड विकत घेतो पाटाच्या (धान्य) दृष्टीने विचार केला तर ४० रुपये मण या हिशोबाने दहा हजार रुपयांचे २५० मण धान्य झाले म्हणजे ३० माणसाना वर

भर पुरेल एवढें धान्य झाले तीस माणसाचें वर्षभराचें भोजन ! याचा अर्थ दर १०० माणसामागे सहा माणसाना उपाशी मारून उरलेल्या ९४ माणसाचे शरीर झाकले जात जेव्हा धान्य एवढें महाग नव्हते तेव्हा गावाला ३ ते ५ महिन्याचे अन्न कपड्यासाठी विकावे लागत होते ५ माणसाच्या कुटुंबाला ज्याची मासिक ३०-३५ रुपये, म्हणजे सालिना ४०० रु. आमदनी आहे— बहुतेक कुटुंबे याच मर्यादेत येतात— अशाना वर्षाकाठी कपड्यासाठी १०० रु खर्च करावे लागतात त्यानी खादीमुळे एवढें वाचविले तर त्यानी आपली कमाई शेकडा २५ टक्क्यानी वाढविली असे सहज म्हणता येईल सर्वात महत्त्वाची गोष्ट ही की पोटाचें धान्य पाठीसाठी द्यावे लागणार नाही खादीमुळे गावात नवीन आशा, नवीन हुन्नर व नवीन सगठनेला सुरवात होईल त्याच्याच आधारावर गावाची सारी विकास योजना उभी करता येईल. या दृष्टीने खादी केवळ कपड्याचा कार्यक्रम नाही पण गावच्या समग्र शिक्षणाचा व सगठनेचा कार्यक्रम आहे तो याच रीतीने चालविला पाहिजे हल्ली कातणारी बाई चर्खा आपल्या स्वत च्या कमाईसाठी चालविते फार थोडे चर्खे परिवारासाठी चालतात आता चर्खा परिवार व गावचा उद्योग या स्वरूपात चालवला गेला पाहिजे

चर्ख्यामुळे कपडा तर तयार होईलच, पण गावात विकासाची बुद्धि तयार होईल, ही मौलिक गोष्ट आहे एकदा विकासाची बुद्धि तयार झाली आणि गावचे लोक "मार्ग-मार्ग" सोडून सपूर्ण गावाच्या उन्नतीची भाषा बोलू लागले म्हणजे शेतीत सुधार होऊ शकेल, गावातील कच्च्या मालापासून निरनिराळे उद्योग सुरू होऊ शकतील, आणि शिक्षण, आरोग्य, ग्राम सगठन, आदि जीवनाच्या दुसऱ्या अगाबद्दलहि नवी दृष्टि निर्माण केली जाऊ शकेल दृष्टि अशी ठेवली पाहिजे की काही दिवसानतर गावातील प्रत्येक पुरुष, स्त्री, युवक, बालक सर्वजण कोणता ना कोणता तरी हुन्नर शिकून तयार होईल आजच्याप्रमाणे कोणीहि हमाली करणारा नुसता मजूर राहता कामा नये हुन्नर—कला—हातात नसेल तर कमाईत [illegible] कशी होईल ?

खादी आज फक्त संस्थाची आहे. ती गावाची कशी होईल ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. खादी हा शेतीला जोडून चालणारा उद्योग आहे ही गोष्ट मुख्यत मनात ठसली पाहिजे ही गोष्ट नजरेसमोर ठेऊन जें गाव आपल्या योजनेच्या भूमिकेत खादीचा अंगीकार करायला तयार असेल त्याला साधन-सामग्री व शिक्षण देण्याचें काम खादी-संस्थांचें आहे कापसाची शेती, पिंजाई, कताई, विणाई, वदल्यात खादी, खरेदी-विक्री इत्यादि कामें संस्थेची न राहता गावची झाली पाहिजेत ज्या गावानी ग्रामदानद्वारा मुक्तीची घोषणा केली आहे अशा एकाच क्षेत्रातील ४-८ गावातून दोन-दोन, तीन-तीन युवकाना निवडून त्याना अवर-कताई, विणाई, वदल्यात खादी, सूत-खरेदी, सामान्य जमाखर्चाचें ज्ञान, सफाई, कपास्ट, प्राथमिक चिकित्सा, शेतीची सामान्य सुधारलेली अवजारें, ग्रामीण पायखानें, मूत्रीघरें, इत्यादीचा सहा महिन्याचा किंवा जरूर तर एक सालचा सुव्यवस्थित अभ्यासक्रम आखून त्यात तयार करणें ही गोष्ट फार उपयुक्त होईल म्हणजे हे युवक शिकून परत गेल्यावर आपापल्या गावच्या विकासाच्या पायाचे आधार-स्तंभ होऊ शकतील परंतु या युवकाना खादी-संस्थानी आपले वैतनिक कार्यकर्ते मुळीच बनवू नयेत त्याच्या निर्वाह वेतनाची व्यवस्था ग्रामसभेने करावी. त्यासाठी सुरुवातीला ग्रामसभेला बाहेरची मदत घ्यावी लागली तरी हरकत नाही

शेती ग्रामीण जीवनाचा आधार आहे, पण त्यात सुधारणा करणें सापें काम नाही, व त्या गोष्टीला काळहि खूप लागतो गावचे लोक श्रम, बुद्धि, साधन-सामग्री व उपभोग याबाबतीत कोठपर्यंत सहकार देतात, सर्वच चालत्या शेतीचे मापनें बाहेरून वित्तरन मिळू शकतात यावर ती सुधारणा अवलंबून आहे. या गोष्टीकडे लक्ष देणे आवश्यक आहेच पण याच्याहि आधी काही स्थानिक बाबींकडे लक्ष देणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ – सर्व गावाने मिळून सामूहिक रीतीने उभ्या पिकाची राखण, जमिनीच्या झगड्याबाबत आपसात निवाल, नेहमीच्या पिकापेक्षा जास्त पीक आले तर त्याचा काही हिस्सा मजुरांना देणे, बैलासाठी कर्ज, चांगल्या बी-बियाणाची व्यवस्था जीव-जंतूपासून पिकाचें संरक्षण, वन्ति-

साठी पाण्याची सोय, हंगामात धान्याची स्वस्त विक्री व नंतर पावसाळ्यात महाग खरेदी यापासून बचावाची सोय. तसेच श्रम, सहकार इत्यादि. हे सर्व प्रश्न ग्रामसभेच्या मार्फत सामूहिक रीतीने सुटायला पाहिजेत. एवढे झाल्यावर शेतीबाबतच्या तांत्रिक व शास्त्रीय बाबींकडे लक्ष देणे सोपे जाईल

पैसा व साधन-सामग्रीच्या दृष्टीने गावे इतकी खक झाली आहेत की ती स्व-सामर्थ्याने काही करू शकतील यावद्दल कधी कधी शंका येते तरीसुद्धा गावाने आपल्या स्वतःच्या बुद्धि, श्रम, व सामूहिक भांडवलाच्या जोरावर सुरुवात केली पाहिजे सर्व मिळून विचार-विनिमय करणे, योजनापूर्वक एकमेकाच्या शेतीत काम करणे, जी काही आपली कमाई होईल तिच्यातून शिल्लक टाकून भांडवल जमविणे या गोष्टी साध्य होतील तेव्हाच जरूर पडली तर बाहेरच्या मदतीचा विचार मनात आणला पाहिजे गावच्या आपल्या भांडवलाच्या प्रमाणातच बाहेरची मदत घेतली जावी. तशी मदतहि शक्यतोवर साधन-सामग्रीच्या स्वरूपातच घ्यावी. कर्जहि ग्रामसभेनेच आपल्या नांवावर घ्यावे व शेत-कऱ्यांना द्यावे कर्ज बुडविण्याची प्रवृत्ति वाढत तर नाही ना, इकडे दक्षतेने लक्ष असावे.

समग्र विकासाचे काम सोपे नाही. तरीहि या कामाची जबाबदारी ग्रामसभेलाच घ्यावी लागणार गावची शक्ति व आवश्यकता या गोष्टी-कडे लक्ष देऊन वर्षासाठी एकत्र, आणि उन्हाळा-पावसाळा-हिवाळा या ऋतूंसाठी अलग अलग योजना ग्रामसभेनेच बनविल्या पाहिजेत. सामान्य-पणे योजना गांवची (गावाने बनवलेली), शिक्षण संस्थाचे (संस्थेने देणे), साधन सरकारचे (सरकारने पुरवणे), अशी योजना असावी. या दृष्टीने सुदृ ग्रामसभा व सेवक-समिति यांचे शिक्षण होणे आवश्यक आहे ग्रामसभेच्या सफलतेवरच आपल्या देशातील लोकतंत्र व समाजवाद यांची सफलता अवलंबून आहे, व ग्रामसभेची सफलता व्यापक लोक-शिक्षणा-वाचून शक्य नाही. योजना अशी होऊ शकते की प्रत्येक ग्रामसभेने पाठविलेल्या दोन युवकांचे प्रशिक्षण विद्यालय-पद्धतीने व्हावे आणि 'ग्रामसभा' व 'सेवक-समिती'चे शिक्षण शिबिर-पद्धतीने व्हावे.

## गांव म्हणजे एक लहान 'राज्यन्' :१४:

ज्या दिवशीं गाव 'ग्रामदान' झालें त्या दिवशीं गावाचा नवीन जन्म झाला. कारण तत्पूर्वी गाव म्हणजे नुसता घराचा एक घोळका होता. त्या दिवसापूर्वी आम्ही आपलें किंवा आपल्या परिवाराचेच नाव घेत होतो, आता या दिवसापासून गावाचें नाव घ्यायला लागू. या दिवसापासूनच ग्रामसभा गावाचे रक्षण, पोषण व शिक्षण यासाठीं जिम्मेदार होईल तिच्या मार्फतच ही सर्व कामें होतील. खऱ्या अर्थानें असे प्रत्येक गाव म्हणजे एक लहानसे 'राज्य'च बनेल आणि ते चालविण्याची शक्ति गांव आपल्यातूनच निर्माण करील.

जी ग्रामसभा पुरुषार्थ करण्यात स्वावलंबी होणार नाहीं ती आपल्या समस्या सोडविण्याची शक्ति विकसित कशी करील? याचा अर्थ असा की गावातील सहकार-शक्ति मुख्य असेल व बाहेरची सरकारी-शक्ति किंवा संस्थेची शक्ति या पूरक राहतील. गाव मुख्यत्वे आपल्याच शक्तीवर उभें राहील त्यासाठी, ज्याप्रमाणे युद्धकाळात नागरिकांना फौजी-शिक्षण घ्यावें लागतें त्याप्रमाणे गावच्या लोकांनाहि शिक्षण घ्यावें लागेल. हें शिक्षण त्या शिक्षणाहून निराळें राहील. गावच्या सेनेला शांति व सुव्यवस्थेचे शिक्षण पाहिजे म्हणून या सेनेला 'शांति-सेना' असे नांव देण्यात आले आहे. जेव्हा अशांतीची परिस्थिति असेल तेव्हा ती शांतीचें काम करील. परंतु इतर वेळीं तर ती 'सेवा-सेने'चेच काम करील— उत्पादना-साठीं श्रम करील, शिक्षण देईल, व्यवस्था सांभाळील — काम कोणतेंहि करीत असो, तिचा प्रयत्न राहील, गावात नेहमी शांति व सद्भावनेचें वातावरण टिकविणें, ग्राम-जीवनात ऐक्य व परस्पर सहकाराचें क्षेत्र वाढवीत राहणें, आणि गावची शक्ति विध्वंसाच्या मार्गाला न लागता विधायक कामात लावणें.

तसा तर गावातील प्रत्येक व्यक्ति—पुरुष, स्त्री, युवक, बालक, वृद्ध— आपल्या गांवासाठी शांति-सैनिक असणारच. तरीहि (शांति) सेनेसाठी

काही लोकांची निवड करून त्यांना पद्धतशीरपणे प्रशिक्षित करावें लागेल. याबाबतीत खोल विचार केल्यानंतर आम्ही या निर्णयावर आलो आहो की संपूर्ण गांवाला आम्ही एक विद्यालय मानू तरच गावाचा विकास होईल. गावात चालणारे प्रत्येक काम – शेती, खत-निर्मिति, पशु-पालन, सुतारी, लोहारी, चाभारी, न्हाव्याचें काम, धोब्याचे काम, आदि त्या विद्यालयाचे शिक्षण-विषय. आजपर्यंत आम्ही फक्त आर्थिक कार्यक्रम चालविला व तोसुद्धा सरस्थेमार्फत केवळ यंत्रवत्. पण यापुढे आम्ही जर शिक्षणाची पद्धति स्वीकारली नाही तर गावकऱ्याच्या हातात कला दाखल होणार नाही, त्याच्या बुद्धीचा विकास होणार नाही की त्याचे संस्कार बनणार नाहीत.

सुरवातीला १६ ते ४५ या वयातील हरेक व्यक्तीने शांति-सैनिक बनावें. त्याना त्याचें शिक्षण देण्यांत यावें. हळू हळू त्यातून तीन पथकें बनविली जाऊ शकतात.

(१) किशोर-पथक, वय १२ ते १८

(२) युवक-पथक, वय १९ ते ३० व ३१ ते ४५ (दोन टोळचा)

(३) वृद्ध-पथक, वय ४६ ते ५५ व ५५ च्या वर (दोन टोळचा)

अशीच जेथें शक्य असेल तेथें मुलींचीं व स्त्रियांचीं पथकें बनविलीं जाऊ शकतात. गावात इतकी कामे आहेत की सर्वांना अलग अलग स्वतंत्र कामे वाटून देता येतील. उदाहरणार्थ–

किशोर-पथक.– (अ) शाळेची सफाई, भाजीपाल्याची शेती – गाजर, मुळे, टमाटे, इत्यादि पदार्थ, जे शेतातून तोडून ताबडतोब खाण्याचे कामी येऊ शकतात.

(आ) सामूहिक उत्सव.

(इ) गावात येणाऱ्या वरातीची सेवा–बिछायत घालणे, वाढणे, नास्ता देणे.

(किशोर-पथकात ७ ते ११ वयापर्यंतची एक 'बालक' टोळीहि बनवता येईल.)

युवक पथक – (क) शातिरक्षा, गाव व पिकाची सामूहिक रखवाली
(ख) श्रमदान व श्रमसहकार – श्रमशिबिर
(ग) सुधारलेली शेती, खादी व अन्य उद्योगाचा तात्रिक अभ्यास, सहकारी मडळाचे सगठन व सचालन

वृद्ध-पथक – (च) न्याय, ग्रामसभा
(छ) दुसऱ्या गावाशी सबध
(ज) युवकाना आशीर्वाद

या दृष्टीने शाति सेनेच्या भिन्न भिन्न पथकाना सुव्यवस्थित अभ्यास क्रम बनवून शिक्षण देता येईल अस झाले तर गावच्या जीवनात शिक्षण व विकास यात भेद राहणार नाही शिक्षणाने विकास होईल व विकासामार्फत शिक्षण, आणि गावचा प्रत्येक रहिवासी या दोन्ही प्रक्रियामधे दाखल झालेला असेल

शाति-सेनचे सगठन अनेक स्तरावर होऊ शकेल – गाव, पचायत, विकास-खड, जिल्हा, राज्य, देश, विश्व आपली आपली निष्ठा व शक्ति याना अनुसरून शाति सैनिक आपापल्या क्षेत्रात काम करतील असेहि शाति-सैनिक असू शकतील, जे देशासाठी आणि त्याच्याहि पुढे जाऊन विश्व-शातीसाठी स्वत ला समर्पित करतील साप्रत मानव जगात समाज, जाति, दश, घन, धर्म, लिग इत्यादीच्या कृत्रिम भिती उभ्या करून एक दुसऱ्यापासून अलग होत आहे, आणि आपले सर्व प्रश्न सोडविण्यासाठी हातात बदूक घेऊन आपला व साऱ्या मनुष्य जातीचा सर्वनाश करण्यासाठी उभा ठाकला आहे तेव्हा अशा शाति-सेनची आवश्यकता आहेच ही शाति-सेना दाखवू शकेल की शातीच्या शक्तीन सरक्षण, निर्माण व समाज परिवर्तन ही तिन्ही कामें होऊ शकतात जगाला जर घरगुती भाडण व मोठीं युद्धें याच्या आगीतून जळून नष्ट हाण्यापासून वाचवायचें असेल तर प्रत्येक क्षत्रात शातीची शक्ति प्रगट करणारी शाति-सेना हवी आहे गावापासून तिचा शुभारभ होईल ग्राम जीवनच तिचें पहिल प्रयोग क्षेत्र होईल

शांति-सेनेत दोन प्रकारच्या मुक्तीची कल्पना आहे. ज्याप्रमाणे खादीमध्ये भांडवलशाहीपासून मुक्तीची अपेक्षा आहे, त्याप्रमाणें शांति-सेनेत सपाट्याने वाढणाऱ्या लष्करी सेनेपासून व नोकरशाहीपासून मुक्तीची कल्पना आहे. आज देशातील पाच लाख गावात जवळ-जवळ पंचावन्न लाखापेक्षा जास्त सरकारी नोकर आहेत – गावामागे अकरापेक्षा जास्त ! आणि दिवसेदिवस ही संख्या वाढतच आहे. जर देशामध्ये लष्कर व नोकर-शाही वाढण्याचा वेग हाच राहिला तर देश एक विशाल 'तुरुंग'च बनून जाईल. मग 'लोक' स्वत. काय खातील आणि आपले 'रक्षक' व 'सेवक' यांना काय खाऊ घालतील ? प्रश्न केवळ खाण्यापिण्याचाच नाही, मनुष्याची स्वतंत्रता व त्याच्या व्यक्तित्वाचा विकास याचाहि आहे. शांति-सेनेला याचें रक्षण करावयाचें आहे.

● ●

# नव्या काळाची नवी क्रांति :१५:

शांतीनेहि का कधी क्रांति होऊ शकते ? लोकांच्या डोळ्यांत क्रांतीचा रंग नेहमी लाल राहिला आहे. आज गांवात, देशात, जगात, दरेक ठिकाणी व्यापक शांतीची आकांक्षा आहे. त्याच बरोबर अशांति, संघर्ष व युद्धाची परिस्थितीसुद्धा तितकीच व्यापक आहे. आकांक्षा व परिस्थिति यांच्या या विरोधामुळे मनुष्य अगदी त्रस्त आहे. त्याला शांति पाहिजे आहे. पण शांतीमधे समस्या सोडविण्याची शक्ति त्याला दिसत नाही. परिस्थितीमुळे तो घाबरतो तिच्यासमोर तो स्वतःला असहाय मानतो

एके दिवशी बनारसला मी आपल्या घराच्या तळमजल्यावरील एका खोलीत गप्पा मारीत बसलो होतो. इतक्यात एक मित्र आले. वय ३५-३६ वर्षांचे. लहानपणचे वर्ग-मित्र. जरा मोकळेपणाने म्हणाले : "भाऊजी, आज जगन्‌गंजमधे क्रांति घडली ! तुम्ही ऐकले का ?" मी म्हटले . "क्रांति झाली ? काय झाले, सांगा तर खरें !" "हो हो, अगदी पूर्ण क्रांति ! पिठाच्या गिरणीच्या चौरस्त्यावर जोराचा लाठीहल्ला झाला. लोक मुसदेवला घेऊन दवाखान्यात गेले आहेत."

"हो ? हें सर्व झाले खरें, पण यांत क्रांति कसली ?"

"वा ! डोके फुटले, हात तुटला, तरी तुम्हाला क्रांति नाही वाटत ?"

"जरा बसा. चहा घ्या. अहो, अशा रीतीने क्रांति होऊ लागली तर रोज इतक्या क्रांत्या होतील की राहणे कठिण होऊन बसेल !" मी म्हणालो.

काय करावें ? सामान्य माणसाच्या डोक्यांत रक्तरंजित-संघर्ष हेंच क्रांतीचें चित्र आहे. समजावले तर तो समजतो खरा, पण काही झाले

तरी संस्काराचा बुद्धीवर पगडा बसतोच सामान्य लोक समजावले तर समजतात तरीपण संघर्ष हेच प्रगतीचे दर्शन बनल्यामुळे समस्या कठिण झाली आहे. गोष्ट अशी आहे की विज्ञान व लोकतंत्राच्या या बदलत्या काळात समाज-परिवर्तनाच्या प्रश्नावर ज्या दृष्टीने विचार करायला पाहिजे ती दृष्टि अजून प्रसारित झाली नाही. गेल्या वीस वर्षांमध्ये ज्या वेगाने परिस्थितीत बदल झाला आहे व होत आहे त्या वेगाने आमची विचार करण्याची व काम करण्याची प्रणाली बदलली नाही तरी अडचण ही आहे की समाजाच्या प्रत्येक क्षेत्रात राजकारणी व व्यापारी लोकांच्या हातात नेतृत्व आहे इकडे सेना ( लष्कर ) राजकारणात झपाट्याने घुसली आहे आणि राजकीय पुढाऱ्याचा पोषाख चढवून सैनिक जनतेला मुक्ति देण्याच्या बहाण्याने पुढे आला आहे नेतृत्वाच्या या त्रिवेणीने सरकार व बाजार या दोहोवर आपला पगडा बसविला आहे शिक्षण व प्रचार यावर नियंत्रण असल्याने लोक कोणत्याहि समस्येचे खर चित्र पाहू शकत नाहीत

जग छोटे झाले आहे, समस्या खोल झाल्या आहेत, आणि त्याचे क्षेत्र व्यापक झाले आहे आमच्या गावची समस्या केवळ गावापुरतीच राहिली नाही पण संपूर्ण देशाची व समाजाची झालेली आहे आणि खुद्द भारताची समस्या सगळ्या आशिया आफ्रिकेबरोबर जोडली गेली आहे या विशाल भूभागातील प्रत्येक देशाच्या समोर स्वातंत्र्यामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीने जे आव्हान उभे केले आहे त्याची तीन स्वरूपे झाली आहेत-

संरक्षण (डिफेन्स)
विकास (डव्हलपमेन्ट)
लोकतंत्र (डेमॉक्रसी)

या तीन 'डी आहेत ज्याच्याशी इतर सर्व समस्या जोडल्या गेल्या आहेत यापैकी एकीला दुसरीपासून अलग करणे दुरापास्त आहे

या त्रिविध आव्हानाचे मूळ आहेत-आशिया व आफ्रिका या दोन्ही खंडात, एक नाही पण तीन क्रांत्या एकाच वेळी होऊन राहिल्या आहेत

पहिली क्रांति अमरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धासारखी आहे, जी स्वातंत्र्यासाठी वसाहत वादाचा अंत करू इच्छिते दुसरी क्रांति फ्रान्सच्या क्रांतीसारखी आहे, जी थोड्या लोकांच्या हातात एकवटलेली सत्ता संपत्ति सर्व लोकांच्या हातात वाटू इच्छिते तिसरी क्रांति, आहे औद्योगिक क्रांति, जी हस्त कौशल्याच्या संस्कृतीला यंत्र संस्कृतीमध्ये बदलवून राहिली आहे यामुळे एकीकडे कोट्यावधि लोकांच्या मनात नवीन आशा आकांक्षाचा उदय होत आहे, तर दुसरीकडे अशा अनेक समस्या उत्पन्न झाल्या आहेत की ज्याच्या निराकरणावर केवळ आशिया-आफ्रिकेचेच नव्हे तर सर्व जगाचे भवितव्य अवलंबून आहे

एकाच क्रांतीचा धक्का समाजाला अगदी मुळासकट हल्वून टाकायला पुरेसा आहे अशा स्थितीत समाजाला एकाच वेळी तीन-तीन जबरदस्त क्रांत्याचे धक्के सहन करावे लागत असताना एखाद्या समस्येच्या निराकरणासाठी परिचित मूल्यें व प्रचलित पद्धति उपयोगी पडू नयेत यात काय आश्चर्य ? 'संरक्षण (डिफेन्स) ही प्रत्येक देशाची चिंतेची पहिली बाब आहे आणि त्या चिंतेपासून बचावाचा एकच उपाय मानला गेला आहे – सैनिक शक्ति पण आजच्या दुनियेत दुर्बल व गरीब देशासाठी सैनिक शक्ति, हा विश्वासपात्र आधार राहिलेला नाही, त्यामुळे असा प्रत्येक देश आज कोणत्या ना-कोणत्या मोठ्या देशाच्या संरक्षणाखालीच सुरक्षित आहे

संरक्षण प्रत्येक देशाची मुख्य चिंता आहे म्हणून विकासाचा संपूर्ण कार्यक्रम संरक्षणमूलक (डिफेंस सेन्टर्ड) झाला आहे संरक्षणाची पद्धति जुनी आहे म्हणून विकासासाठीहि जुन्या पद्धतीचा अंगीकार केला गेला आहे त्यामुळे विकासाचा मुख्य आधार भाडवलच (नगदी पैसा) मानले गेले आहे आणि त्यासाठी मोठ्या प्रमाणावर देशी विदेशी भाडवल जमा करण्याचा प्रयत्न केला जात आहे विकासाला आधारभूत कार्यक्रम म्हणून पाश्चात्य पद्धतीच्या केंद्रित औद्योगीकरणाचाहि स्वीकार करण्यात आला आहे आणि या व्यापक कार्यक्रमात व्यक्तिगत भांडवल-दाराशिवाय खुद्द राज्य-सरकारच 'पब्लिक सेक्टर'च्या नावाने भांडवल-

दाराच्या रूपाने पुढे आले आहे. देशाच्या विकासाची नीति सरकारच्या एका सुनिश्चित योजनेप्रमाणे सचालित होत असतानासुद्धा उत्पादनाची व वितरणाची मुख्य प्रेरणा व्यक्तिगत नफ्याचीच (प्रायव्हेट प्रॉफिट) आहे, आणि कोणताहि देश अजूनपर्यंत बाजारच्या अर्थ-नीतीपासून मुक्त झाला नाही किंवा त्या दिशेने दृढतेने पाऊल टाकतानाहि दिसत नाही विकासाच्या दरेक अगोपागाला स्पर्श करणारी योजना जरी आखली गेली आहे तरी कोणत्याहि देशाने आपली सपूर्ण श्रम-शक्ति उत्पादनाच्या कामात गुतविण्याचा प्रयत्न केला नाही ! अजूनहि सगळीकडे बेकारीचे व विषमतेचे साम्राज्य चालू आहे

सरक्षण, पारपरिक, विकास पारपरिक तसेच राजनैतिक तत्रहि पारपरिक राहिलेले आहे प्रत्येक ठिकाणी लोकतत्राचे स्वरूप पक्ष-तत्राचे आहे – कोठे एक पक्ष आहे तर कोठे एकापेक्षा अधिक पक्ष आहेत पण सासदीय लोक-तत्राला मर्यादित व सकुचित करण्याचाच प्रत्येक देशाचा कल आहे. प्रत्येक ठिकाणी लोकशक्ति (सिव्हिल पॉवर) सैनिक-शक्तीच्या (मिलिटरी पॉवर) खाली दबलेली दिसून येत आहे कोठलेहि बाह्य तत्र कसाहि प्रकारचे असले तरी दरेक ठिकाणीं शासनाची अतिम शक्ति नोकरशाही व सेना याच्याच हातात आहे. अशा तऱ्हने आपल्याला दिसून येईल की सरक्षण, विकास व लोकतत्र या तिन्ही क्षेत्रात या नवीन देशांनी पाश्चिमात्य पद्धतीचाच स्वीकार केला आहे कोणीहि आपल्या विशेष परिस्थितीला अनुरूप एखादा नवीन नमुना विकसित केला नाही समस्या तर नवीन, आणि त्या सोडविण्यासाठी स्वीकारलेल्या सर्व पद्धति मात्र जरा जुन्या असल्या तर काय परिणाम होईल ही विचारार्ह गोष्ट आहे ! जुन्या पद्धतीनी नवीन समस्याच्या आव्हानाचा सामना करता येणे शक्य आहे काय ?

सरक्षणाच्या नावावर प्रत्येक देशात सरक्षणाचे बजेट वाढतच आहे व सैनिक-वादाचा बोलबाला होत आहे तिकडे विकासाच्या क्षेत्रात एकदरीत अशी परिस्थिति निर्माण झाली आहे की विकासामुळे, एकाच देशात, राष्ट्राची अर्थ नीति, त्याच राष्ट्रातील जनतेच्या अर्थ नीतीहून भिन्न झाली

आहे राष्ट्राची संपत्ति वाढत आहे पण जनतेचे सुख मात्र आटत आहे, व मूळ उत्पादकाचा दिवसेंदिवस ह्रास होत आहे! तर अशा स्थितीला काय म्हणता येईल ? व्यक्तिगत भांडवलदारी व राज्यशासनाची भांडवलदारी अशा दुहेरी व्यवस्थेत एकूण उत्पादनाचे आकडे कितीहि (चढवून) दाखविले गेले असले तरी या लोक-कल्याणकारी भांडवलदारीची अनिवार्य परिणति झाली आहे – विषमता, भ्रष्टाचार, बेकारी, शोषण, आणि उत्पादकाचा ह्रास! इतकेच नव्हे, तर विकासाच्या या योजनामध्ये जनतेचे-हि काही स्थान आहे असे दिसून येत नाही. नित्य नवी नवी संकटें, संघर्ष, आणि अभाव यानी होरपळलेली जनता प्रत्यक्ष अनुभवीत आहे की जगणे तिच्या आवाक्याबाहेर जात आहे आणि तिला असे वाटू लागले आहे की जणू काही देश सरकार व बाजार याच्या हातात गहाण ठेवला गेला आहे

अशा प्रकारची अर्थ-नीति लोकतंत्राच्या विकासाला स्वाभाविकच फारशी मदतरूप होऊ शकत नाही. शासनाची शक्ति व क्षेत्र याची अफाट वाढ झाली आहे असे तर दिसतें पण 'लोक-तंत्रा'तील 'लोक' मात्र कोठेंच दिसत नाही सर्वत्र प्रत्येक ठिकाणीं 'तंत्र' 'लोका'च्या छातीवर आरूढ झाले आहे लोकतंत्रामधे लोक 'मालक' म्हणून बोलले जाते पण प्रत्येक ठिकाणी 'लोक' नोकरशाहीच्या कचाट्यात सापडले आहेत. नोकरशाहीच त्याचे शासन व संचालन करते. राजकारणाच्या संगमावर शासक आणि शेटजी गंगा-यमुनेप्रमाणे एकत्र मिळालेले दिसतात आणि सैनिकहि सरस्वतीप्रमाणे गुप्त नाहीच, पण बऱ्याच प्रमाणात प्रगट आहेत. देशाचे सारे जीवनच सैनिक शासक-शेटजी या धुरेवर फिरून राहिले आहे लोकांच्या आवश्यकता व आकांक्षा याची पूर्ति होत नाही. राजनैतिक नेतृत्व अप्रतिष्ठित होत आहे. यामुळे व्यापक निराशा व असमाधान याच्या वातावरणात समाजातील विघटनकारी प्रवृत्ति वाढत आहेत आशिया-आफ्रिका याच्या नभोमंडळात फॅसिस्टवादाचे काळे ढग पसरत आहेत अशा परिस्थितीत लोकांच्या पूर्ण मुक्तीचे साधन या रूपाने सेना सर्व ठिकाणी पुढे आली आहे आणि तिने लोकतंत्राचे तंत्र आपल्या हातीं घेऊन 'लोका'ना बंदुकीच्या हवाली केले आहे लोक-कल्याणकारी राज्य

व पक्षीय-लोकतन्त्राच्या गर्भातून सैनिक-तन्त्राचा जन्म एका मागून एक दुसऱ्या देशात होत आहे. भारत यातून कसा वाचू शकेल ?

या देशाची ही दशा का झाली ? याचे उत्तर इतिहासातून मिळेल. हे देश दीर्घकाल गुलामगिरीतून गेलेले आहेत. त्यामुळे त्यांच्या राष्ट्रीय-जीवनाचा सहज स्वाभाविक विकास होऊ शकला नाही आणि ज्या क्रांत्यांनी पाश्चात्य देशात नवा इतिहास घडविला त्या क्रांत्या या देशात योग्य काळी होऊ शकल्या नाहीत. याच्या उलट गुलाम-गिरीच्या काळात विदेशी-साम्राज्यवाद व स्वदेशी-सामंतवाद यांची पकड अधिक घट्ट आवळली गेली. सामंतवादाने साम्राज्यवादाला ताकद दिली आणि साम्राज्यवाद निघून गेल्यानंतर त्याने पोसलेला सामंतवाद पुंजीवादाशी हात मिळवणी करून उत्तराधिकारी झाला व विज्ञान आणि लोकतंत्राच्या घोषणा करून पुढे आला. म्हणून आम्हाला दिसून येत आहे की राजनैतिक नेतृत्वाच्या रूपाने प्रत्येक देशाचा नवा सामंतवाद, स्वतःला अनुकूल लोकतंत्राचा त्याच मर्यादेपर्यंत स्वीकार करीत आहे जो त्याला (नव्या सामंतवादाला) कोणत्या-ना-कोणत्या रूपाने जिवंत राहू देईल. साम्राज्यवादाच्या मुठीतून निसटलेला प्राय प्रत्येक देश, संस्काराने सामंतवादी, आकांक्षेने पुंजीवादी, आणि घोषणात समाजवादी आहे. आणि दुसरीकडे स्वाभाविक विकास व लोकशक्तीचे संगठन करण्यास अवकाश न मिळाल्यामुळे, जनतेचा बौद्धिक ह्रास व चारित्र्य-पतन होणें, जे अनिवार्य होते, ते भरपूर झाले आहे.

स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर आमच्या राष्ट्राच्या नेत्यांनी परिस्थिति व काळाचा संकेत ओळखला असता आणि हिंमतीने विकासाची एखादी नवी दिशा स्वीकारली असती तर ह्या स्थितीत बदल झाला असता. पण त्यांनी तर आज्ञाधारक मुलाप्रमाणे बापाचा वारसाच पुढे चालू ठेवला. परिणाम असा झाला की देशाने राजनीति, अर्थ-नीति, समाज-नीति, धर्म-नीति शिक्षण-पद्धति यापैकी कोणत्याहि क्षेत्रात गुलामी-काळातील सामंतवादी व मध्यमवर्गीय पद्धतीच्या पुढे जाऊन नवी लोकवादी-नीति चालविली नाही. नोकरशाही, पुंजी व पक्ष यांनी मिळून जुन्याच पायावर कल्याण-

कारी राज्याचा (वेलफेअर स्टेट) नवा वि-मुजातवार सागाडा उभा करण्याचा प्रयत्न केला आहे राष्ट्राच्या विशाल रंगभूमीवर सगळें नाटक मध्यमवर्गच खेळून राहिला आहे हे आपण पाहात आहोत. जनता फक्त मागे मागे काही इकडची तिकडची किरकोळ भूमिका पार पाडते आहे. तिच्या नावावर पंचायती-राज किंवा विकासाच्या ज्या काही योजना तयार केल्या गेल्या असतील त्या सर्व सत्ता व संपत्तीच्या (पॉवर व प्रॉपर्टी) पोटात गडप झाल्या आहेत. निराशेमुळे लोकांनी स्वतःला अलग करून घेतलें व ते निष्क्रिय बनले. त्यांनी जीवनातील सारे विकार व विकृति यांना जीवनाचें सहज अंग मानून त्याचा स्वीकार केला आहे. आज सगळा देश जणू काही पक्षाघाताच्या रोग्याप्रमाणे चेतनहीन झालेला आहे. सर्वांच्या हृदयात हिंसेची गुप्त धारा वाहते आहे. मनामध्ये बर्फाप्रमाणे गोठलेली ही हिंसा केव्हा, कशा रीतीने फुटून वाहू लागेल, हे कोणी सांगू शकत नाही.

अशी आहे आजची परिस्थिति तिच्यातून आम्ही बाहेर पडू इच्छितो. पण बाहेर कसे पडावें हें सुचत नाही हे स्पष्ट आहे की ज्या (पाश्चात्य) देशात क्रांत्या क्रमाक्रमाने झाल्या त्यांना मध्यंतरीच्या काळात संगठनेला वेळ मिळत गेला, त्यामुळे ते देश उपयुक्त संस्था व सामाजिक चारित्र्य यांचा विकास करीत करीत पुढे सरकले. पण आशिया-आफ्रिकेतील नव्याने स्वतंत्र झालेल्या देशांना तीन-तीन क्रांत्यांना एकदम तोंड द्यावें लागत असल्याने प्रचलित पद्धतीनी त्यांचे काम चालत नाही असें दिसून येत आहे. हे निश्चित आहे की या देशाच्या विशेष परिस्थितीमुळे क्रांतीच्या प्रावेगाचें (डायनेमिक्स) जें स्वरूप प्रगट होईल तें आतापर्यंतच्या परिचित स्वरूपाहून निराळें राहील. म्हणून आम्हाला क्रांति व समाज-परिवर्तनाच्या संपूर्ण प्रश्नाबाबत आणि या प्रश्नाशी संबंधित असणाऱ्या आपल्या सर्व पायाभूत मान्यताबाबत नव्या रीतीने विचार करायला तयार राहावें लागेल.

काही झालें तरी, सांप्रतच्या काळात कोणत्याहि विचाराची भूमिका ✓ विज्ञान आणि लोकशाहीला सोडून दुसरी असू शकत नाही. विज्ञान व लोकशाहीला सोडून क्रांति व समाज-परिवर्तनाबाबत विचार करणे इतिहासाला

मागे नेण्यासारखें होईल. कारण आज समाजाच्यासमोर जे प्रश्न आहेत ते विज्ञानावाचून व लोकतत्रावाचून दुसऱ्या कोणत्याहि भूमिकेतून सुटूच शकत नाहीत.

लोकतत्राने समतेची मागणी पुढे आणली आहे आणि विज्ञानाने सर्वांच्या सुखाची संभावना प्रगट केली आहे काही लोकांचे लोकतत्र म्हणजे फॅसिस्टवाद, व 'काही'चे विज्ञान म्हणजे व्यवसाय-कारखानदारी 'सर्वांसाठी विज्ञान व सर्वांसाठी लोकतत्र' हे आहे विज्ञान व लोकतत्राचे लक्ष्य व आधारहि या दृष्टीने लोकतांत्रिक क्रांति लोकांची आहे – 'कॉमन मॅन'ची आहे विशिष्ट लोकांची नाही आजपर्यंतच्या क्रांत्यात हिंसात्मक संघर्षाचे जें तत्त्व अंतर्भूत आहे त्याचा विज्ञानाशी मेळ बसत नाही तसाच लोकतत्राशीहि मेळ बसत नाही. विज्ञानाच्या विकासामुळे संघर्ष सर्वनाशाचा धाकटा भाऊ होऊन बसला आहे लोकतत्राच्या भूमिकेत तर संघर्ष लोकतत्राचा पायाच समूळ उखडून टाकतो कारण प्रत्येक संघर्ष क्रांतीला 'लोकां'च्या हातून हिसकावून घेऊन थोड्याशा 'पुढाऱ्यां'च्या हातात केंद्रित करून देतो मग ते पुढारी निवडणूक लढविणाऱ्या पक्षाचे असोत किंवा गुप्तपणे सशस्त्र षड्यत्र करणाऱ्या एखाद्या दलाचे असोत

विज्ञान व लोकतत्र याच्या सफलतेसाठी जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात अनाक्रमणाची (नॉन् अॅग्रेशन) आवश्यकता आहे ज्या प्रक्रियेमधे व्यक्तीचे व्यक्तीवर व समाजाचे समाजावर आक्रमण होईल त्या प्रक्रियेपासून विज्ञान व लोकतत्र याची निष्पत्ति होणार नाही लोकतत्राचा आधार 'लोक'– नागरिक आहे लोकांचीच शक्ति लोकतत्राची शक्ति आहे. लोक-शक्ति (नागरिक शक्ति) व सैन्य-शक्ति दोन्ही परस्पर विरोधी तत्त्वें आहेत या दोहोपैकी आम्ही कोणाचा स्वीकार करतो या प्रश्नाच्या उत्तरावर लोकतत्राचे भविष्य अवलबून आहे या प्रश्नाच्या उत्तरावर ही गोष्टसुद्धा अवलबून आहे की लोकतत्र, सरकार-शक्ति म्हणजेच सैन्य शक्तीच्या जोरावर चालणार आहे की सहकार-शक्तीच्या म्हणजेच लोक-शक्तीच्या सहाय्यावर चालणार आहे ! म्हणून लोकशक्तीच्या आधारे चालणाऱ्या लोकतत्रासाठी लोकांच्या – जनतेच्या – स्वावलबी, सहकारी एकम् (युनिट)

ची कल्पना मांडली गेली आहे हे उघड आहे की विज्ञान व लोकतंत्र या दोहोंचा विकास लोकांच्या शांतिपूर्ण सहकार-शक्तीबरोबर जोडलेला आहे, आणि असे वाटते की एकाच्या विकासासाठी दुसऱ्याचा विकास अनिवार्य आहे

जर ही गोष्ट खरी असेल तर ज्यामध्ये युद्ध, संघर्ष, किंवा षड्यंत्र असणार नाही तीच या नवीन काळाची सामाजिक क्रांति होऊ शकेल. संघर्ष उघड असो वा षड्यंत्रद्वारा गुप्त असो, तो नेहमी पक्ष-विरोधाच्या माध्यमातून होतो म्हणून संघर्षात विजय नेहमी पक्षाचा होतो पण आजच्या लोकतंत्राला आवश्यकता आहे संपूर्ण 'लोक'-विजयाची कोण्या एका काळीं साम्य-वादाने क्रांतीसाठी संघर्षाचा सिद्धांत मांडला होता आणि कित्येक देशांनी त्याचा अंगीकारहि केला त्याचा काय परिणाम झाला तो ठाऊकच आहे कोठे आहे त्यातील 'लोक' व कोठे आहे त्याची 'स्वतंत्रता'? आपल्या देशात स्वराज्याच्या लढाईसाठी संघर्षाचा नाही, शांतिपूर्ण दबावाची (पीसफुल प्रेशर) पद्धत स्वीकारली गेली होती

असें असू शकेल की ऐतिहासिक दृष्ट्या साम्यवादाच्या पुढे संघर्षा-शिवाय अन्य कोणताहि पर्याय दिसला नसेल तसेच भारताच्या स्वराज्य-सैनिकांसमोरहि दबावाशिवाय दुसरा पर्याय दिसला नसेल पण आज ज्या वेळीं विज्ञानाची पराकाष्ठेची संयकरता व लोक-शक्तीची संपूर्ण शक्यता प्रगट झालेली आहे अशा वेळी संघर्ष किंवा दबाव याच्या पुढच्या पावला-विषयीं विचार करायला पाहिजे. खुद्द दबावाला (प्रेशर) आपण संघर्षाच्या पुढचे पाऊल मानू शकतो, पण दबावाच्या पुढले पाऊल दबावापेक्षा अधिक सौम्य असायला पाहिजे, हे निश्चित आहे संघर्षामध्ये विरोधकाचे दमन आहे, त्यात दमनामार्फत समाज-परिवर्तनाची प्रक्रिया आहे; दबावात (प्रेशर) विरोधकाचे दमन नाही, त्याचे (विरोधकाचे) आत्म-समर्पण आहे

वास्तविक लोकतांत्रिक-क्रांतीची प्रक्रिया यापेक्षा भिन्न अशी असली पाहिजे की 'लोक' आपल्या सामूहिक निर्णयाने समाज-परिवर्तनाची पद्धति व शक्ति दोन्ही निर्माण करू शकतील प्रचलित लोकशाही प्रतिनिधी-मार्फत मंजूर केलेल्या कायद्याने जे परिवर्तन होते त्याचा सरळ पोलीस

शिपायी असतो, त्यामुळे लोकांच्या सहकार-शक्तीचा विकास होत नाही लोक-शक्तीची क्रांति प्रत्यक्ष कार्यवाहीची (डायरेक्ट अॅक्शन) प्रक्रिया आहे आणि त्या प्रक्रियेचा पाया विचार-परिवर्तनाच्या आधारावर सामूहिक आत्म-निर्णय हा आहे

संघर्ष अथवा दबाव (प्रेशर) याच्या क्रांति दर्शनात समाज सपन्न (हॅव्ज्) व विपन्न (हॅव-नॉटस) या दोहोत विभागला जातो, आणि मानले जाते की दोहोमध्ये काही समान तत्त्व (कॉमन ग्राऊन्ड) नाही, म्हणून एकाच्या विजयात दुसऱ्याचा पराजयच केवळ नव्हे, तर समूळ नाश आवश्यक मानला जातो समूळ नाशाची (एलिमिनेशन) ही पद्धति विज्ञानात व्यवहार्य नाही, व लोकशाहीत उचित नाही लोकशाही ही नष्ट करण्याची (एलिमिनेशन) प्रक्रिया नाही, आत्मसात करण्याची (अॅसिमिलेशन) प्रक्रिया आहे.

कोणत्याहि प्रक्रियेत, मग ती कितीहि शांतिपूर्ण का असेना, विपक्षाला नष्ट करण्याचा आग्रह असेल तर त्यामुळे लोकशाहीचे पोषण होऊ शकत नाही म्हणून आता असे समजूनच चालावे लागेल की समाजात सर्वत्र सपन्नच (हॅव्ज्) आहेत, विपन्न कोणीहि नाहीत आणि याच भूमिकेत सामाजिक शांतीचा विचार करावा लागेल जमिनीचा मालक, पुंजीचा मालक, श्रमाचा मालक, बुद्धीचा मालक – जे कोणी आहेत ते सर्व मालकच मालक आहेत सर्व मालकांना एकत्र आणून भागीदारीची नवीन समाज-रचना करावी लागेल मालकी कोणा एकाची असणार नाही मालक जेव्हा आपली मालकी सोडून देतो तेव्हा त्याची सृजन-शक्ति प्रगट होते या सर्जनात्मक-शक्तीला (रचनात्मक-शक्तीला) वर्ग-संघर्षाच्या (आणि आमच्या देशात जाति-संघर्ष, धर्म-संघर्ष, राज्य संघर्षसुद्धा आहेत) आगीत जाळून टाकणे समाजाचे अहित करणे आहे असे करणे म्हणजे क्रांति नव्हे, क्रांतीचा विरोध करणे आहे ।

हजारो वर्षांच्या विराम-क्रमात जग आज विज्ञान व लोकतंत्राच्या त्या टप्प्यावर येऊन पोहोचले आहे त्या ठिकाणी 'विचारा'ला सामाजिक-रचनेचे (मोरल फोर्स) रूप देऊन आणि विचार परिवर्तनाने समाज

परिवर्तनाची प्रक्रिया बनवणे शक्य झाले आहे. आजचा नागरिक पूर्वीच्या नागरिकापेक्षा परिस्थितीच्या सर्वेतला पुष्कळ जास्त समजतो. तो विचाराचे सामर्थ्य कबूल करतो. त्याची सहानुभूति व्यापक झाली आहे. त्याला ही प्रतीति आली आहे की साम्प्रतच्या व्यापक जगात आपल्या स्वार्थाला सामाजिक हितांशी जोडल्याशिवाय स्वतःच्या समस्याहि सुटू शकणार नाहीत. म्हणून शांतिसंरक्षासाठी हे काम अगदी तयार झाले आहे की लोक-शिक्षणाप्रमाणे त्याने व्यापक प्रमाणावर लोक-मानसात अशी प्रतीति जागवली पाहिजे की लोकामध्ये सामूहिक-निर्णयाची भूमिका तयार व्हावी या प्रक्रियेत जोर प्रतिकारावर (रेजिस्टन्स) नाही पण मदत करण्यावर (असिस्टन्स) आहे, म्हणजे योग्य विचार काय आहे याची प्रतीति आणून देण्यात सहायक होण्यावर आहे

अशा परिस्थितीत शांति, तलवार व कायद्याचा मार्ग सोडून स्वतः संघर्ष-मुक्त होऊन लोक-शिक्षण, लोक-संमति, व लोक-निर्णय यांचे संमिलित प्रक्रिया बनून जाते मग प्रश्न उठतो — या प्रक्रियेत प्रतिकाराला स्थान मुळीच नाही काय ? संघर्षासाठी तर नाहीच नाही प्रतिकार व विरोध यात फरक आहे. प्रचलित लोकशाहीमध्ये विरोध सत्ता-प्राप्तीचे एक साधन मानले गेले आहे याच्या उलट प्रतिकारात सत्ता-प्राप्तीची नाही पण स्वत्व-रक्षणाची दृष्टि असते. मात्र त्याला अशी आहे की त्या स्वत्व-रक्षणाचा विचार विरोधकालाहि मान्य असतो, पण मान्य करूनहि तो दुसऱ्याच्या स्वत्वाचे अपहरण करण्याचा अनधिकृतपणे प्रयत्न करीत असतो मग प्रश्न निर्माण होतो की नवीन विचार मान्य करवून घेण्यासाठी प्रतिकाराचा उपयोग होऊ शकत नाही काय त्याला उत्तर आहे — लोकशाहीच्या भूमिकेत होऊ शकत नाही. पण विचार सर्वमान्य झाला असेल त्याला अनुसरून आचरण न करण्याचा दुराग्रह असेल तर त्याचा सत्याग्रही-प्रतिकार अवश्य होऊ शकतो.

स्पष्ट आहे की प्रतिकाराची ही स्थिति (रेजिस्टन्स) मान्य आहे, सामान्य नियम सहकाराचाच आहे. संघर्षमुक्त कोणीमध्ये बंड म्हणजे विरोध नाही. या कार्यांमध्ये सहकार-वृत्तीचे दर्शन आहे.

जर नवीन क्रांतीसंबंधाने ही स्थिति मान्य असेल तर नव-समाज-निर्मितीच्या प्रश्नाबाबत नव्या रीतीने विचार करण्याची आवश्यकता आहे. प्रचलित मान्य धोरणे फारशी उपयोगी पडतील असे दिसत नाही. राष्ट्र-संरक्षार्थ सैनिक-शक्तीच्या विरोधात शांतिपूर्ण सामूहिक-प्रतिकार अधिक परिणामकारक (कार्यक्षम) उपाय होऊ शकेल की नाही याबद्दल विचार करावा लागेल. समाजाचा समग्र विकास काय सहकाराच्या दंडुक्यानेच होऊ शकेल ? त्यासाठी शैक्षणिक प्रक्रिया जास्त वैज्ञानिक, जास्त लोकतांत्रिक, जास्त समर्थ, जास्त उपयोगी, जास्त सांस्कृतिक होणार नाही काय ? आणि जर समाजाला भिन्न-भिन्न गटाचा व स्वार्थांचा आखाडा बनवायचा नसेल तर राजनीतीच्या स्थानावर लोकनीतीला मान्यता देऊन विराजमान करणे अधिक समुचित होणार नाही काय ? हे प्रश्न असे आहेत की जे समाज-परिवर्तन व समाज-रचनेच्या बाबतीत नवीन दृष्टि स्वीकारण्यास भाग पडतात. त्याचबरोबर हे प्रश्न असे आहेत की त्याचे उत्तर परंपरागत ज्ञान व अनुभव याच्याकडून मिळेल असे वाटत नाही.

जर विज्ञानाच्या व लोकतंत्राच्या भूमिकेत संघर्ष-मुक्त क्रांतीची अपेक्षा असेल तर वर्ग-संघर्ष त्याची प्रावेगिक प्रक्रिया ( डायनेमिक्स ) होऊ शकत नाही. त्याची प्रावेगिक प्रक्रिया विचार-परिवर्तनच होऊ शकते. आणि त्या नव्या प्रावेगाची प्रक्रिया काही एक विशिष्ट प्रकारची नवीन शिक्षण-प्रणालीच होऊ शकेल. ती नवी शिक्षण-प्रणाली शाळेच्या बांधलेल्या अभ्यासक्रमाने मर्यादित होणार नाही. ती गर्भात जन्मल्यापासून मृत्यु येईपर्यंत पसरलेली असेल, आणि संपूर्ण सामाजिक जीवन व प्राकृतिक वातावरण तिच्या कक्षेत अंतर्भूत राहील. अशा नवीन शिक्षण-प्रणालीची तीन स्वरूपें राहतील:–

क्रांतीचे वाहन – नयी तालीम
निर्माणाची प्रक्रिया – नयी तालीम
शिक्षणाची पद्धति – नयी तालीम

यामध्ये प्रौढ-शिक्षण ( लोक-शिक्षण ) व बाल-शिक्षण दोहोंचा समावेश आहे.

त्रातीच्या वाहनाच्या रूपाने नयी तालीमचे ध्येय नव्या समाजाची रचना हे आहे — मग त्याला कोणतेहि नाव द्या. कोणी त्याला 'अहिंसक समाज' म्हणेल, कोणी 'मुक्त व्यक्तींचा बंधुभाव' म्हणेल तर कोणी 'लोकशाही समाजवाद' म्हणेल. प्रत्येक ध्येय गुण-दृष्ट्या आध्यात्मिक असते. म्हणून एक ध्येय दुसऱ्या ध्येयाहून फारसे भिन्न नसते. या वेळी आपल्या देशात नयी तालीमला समाजाची तीन बंधनें एकाच वेळीं तोडायची आहेत — राज्यवाद (स्टेटिझम्), पुंजीवाद (कॅपिटॅलिझम्), सैनिकवाद (मिलिटॅरिझम्) या तिन्हींपासून एकदम मुक्ति मिळावी म्हणून लोकशाहीतील 'लोकां'च्या विचार-परिवर्तनाच्या दृष्टीने आज देशासमोर सर्वोदयाचा *त्रिविध कार्यक्रम मांडण्यात आला आहे त्याची ही तीन तत्त्वे अशी आहेत—*

(१) अभिनव सुलभ ग्रामदान

(२) *ग्रामाभिमुख खादी व*

(३) शांति-सेना

ग्रामदानात शासन-निरपेक्ष सहकारी-समाजाचा पाया आहे, ग्रामाभिमुख खादीमधे पुंजी-निरपेक्ष शोषण-मुक्त औद्योगिक-क्रांतीची योजना आहे आणि शांति-सेनेमधे तर साक्षात् शस्त्र-मुक्त प्रतिकार-शक्ति प्रगट होते. याप्रमाणे हा 'त्रिविध-कार्यक्रम' लोकशाहीला राज्यवाद, पुंजीवाद, आणि सैनिक-वाद या तिन्हींपासून एकाच वेळी मुक्त करणारी क्रांतिकारी योजना आहे.

मुक्तीच्या या क्रांतीची प्रक्रिया काय आहे ? ती प्रक्रिया आहे — विचार-शिक्षण, विचार-परिवर्तन. संपर्क, चर्चा, सभा, साहित्य, पदयात्रा इत्यादींच्यामार्फत विचार जनतेपर्यंत पोहोचविला जातो व चालू परिस्थितीशी जोडून मांडला जातो इतकेच नव्हे तर जेव्हा त्रिविध कार्यक्रमावर आधारलेल्या नवीन ग्रामरचनेचे चित्र रेखाटले जाते तेव्हा त्याच्या सव्यतेने प्रेरित होऊन ग्रामवासी लोक-शक्तीच्या वडाला अनुरूप अशा आपल्या विद्रोह-शक्तीचा परिचय करून देतात, आणि सामूहिक निर्णयामार्फत सामूहिक-मुक्तीच्या (म्हणजे ग्राम-स्वराज्याच्या) उद्दिष्टा-विषयी आपली निष्ठा जाहीर करतात व तशी घोषणाहि करतात. या

घोषणेचे नाव आहे – ग्रामदान. त्याच्यासमोर नाही कायद्याचे दडपण, नाही तलवार-बंदुकीचे भय. भारतभर विखुरलेल्या एकामागून एक ग्रामदानाने हे सिद्ध करून दिले आहे की मनुष्य व त्याची मानवता याच्यात सत्ता व संपत्तीच्या ज्या भिंती उभ्या आहेत त्या तोडण्यासाठी लोक उत्सुक आहेत, पण आजची सामाजिक व्यवस्था व तिच्यामुळे निर्माण झालेले कु-संस्कार यामुळे ते तोडू शकत नाहीत. पण विचारा-मार्फत ज्या क्षणी नवे चित्र (इमेज) त्याच्यासमोर प्रगट होते त्या क्षणी ते मुक्तीची घोषणा करून टाकतात. त्याना वाटते की ग्रामदानातील सामूहिक स्वामित्वामधे सर्वाचे सरक्षण आहे. कौटुंबिक स्वामित्वाचे विसर्जन व सामूहिक सरक्षणाच्या आधारावर नवीन समाजाच्या रचनेच्या दिशेने ग्रामदान हे सुखाचे पाऊल आहे

ग्रामदानामार्फत क्राति प्रत्येक नागरिकापर्यंत पोहोचवते म्हणूनच प्रत्येक नागरिक क्रातिकारी बनतो. ज्या लोकशाही समाजवादाच्या ध्येयाची आपल्या देशाने घोषणा केली आहे त्या दिशेने ग्रामदानामार्फत गावाचे पहिले पाऊल पडते ग्रामदानाची घोषणा लोक-समतीने व लोक-निर्णयाने होते. ती सरकारी कायद्याची वाट पाहत बसत नाही. त्याच-प्रमाणे जमिनीची सामूहिक मालकी आणि गावाची आपली स्वत.ची योजना याच्यामार्फत समाजवाद सुरू होतो, आणि जी ग्रामसभा बनते ती गावात, अल्प-सख्य बहु-सख्य या लोकशाही-तत्राहून भिन्न 'सर्वांच्या लोकशाही'चे व सरकारी समाजवादाहून भिन्न 'लोकाच्या समाजवादा'चे माध्यम बनते. येथूनच समाजाचे समतेच्या दिशेने आरोहण सुरू होते. एकदरीत क्राति ही मनुष्याच्या आरोहणाची प्रक्रिया आहे, त्याच्या अध -पतनाची नाही गावातील लहान लहान माणसाकडूनहि एवढे मोठे काम होणे सभवनीय आहे, 'ग्रामदान' हेच याचे प्रमाण. हे असामुळे सभवनीय होत आहे की ग्रामदानाच्या क्रातीमधे सहकार आहे, सघर्ष नाही; विद्रोह (बड) आहे, विरोध नाही 'ग्रामदान-तुफान' लौकरात लौकर हा सदेश, गावा-गावातून, नगरा-नगरातून, पसरवून राहिले आहे जखडलेला मानव बेडया तोडून फेकून देण्यासाठी आता दुसऱ्याची वाट पाहण्यास तयार नाही.

परिशिष्ट: १

# ग्रामदानाच्या शिक्षणाची योजना

मुक्तीची घोषणा (ग्रामदान)

ग्रामसभा

सेवकसमितीचे ७ सदस्य
तसेच
ग्रामसभेच्या दुसऱ्या काही उत्साही व्यक्ति

२ प्रशिक्षणार्थी

(शिबिर पद्धति) ← लोकशिक्षण → विद्यालय पद्धति

**शिबिर पद्धति**

३ ते ७ दिवसाचे शिबिर
४ तास रोज शिबिर (दर ३ महिन्यानी)

अभ्यासक्रम

(१) ग्रामसभेचे संगठन
(क) घोषणा-पत्र तसेच संकल्प आणि समर्पण-पत्र भरून घेणे, जमीनीचा विसावा हिस्सा काढणे, ग्रामकोष-संग्रह, व विनियोग
(ख) सर्वसम्मति,

**विद्यालय पद्धति**

६ महिने किंवा १ वर्षाचा अभ्यासक्रम—
अथवा
रोज १॥ ते २ रुपये कमविण्याची पात्रता

अभ्यासक्रम

(१) वस्त्रोद्योग—
(क) कापसाची शेती, रेचाई, धुनाई, साधा चरखा, अंबर चरखा, विणाई (स्थानिक

(क) सर्वसमति, सर्वशक्ति, सर्वहित, एकता व समता, भेद व विरोधाचे शांतिपूर्ण निरसन, दलबंदीचे गेप.

(ख) ग्राम-योजना–
गावची वृद्धि, श्रम, पुजीची व्यवस्था, बाहेरची मदत, श्रमसहकार, जमाखर्च विवरण, सुरवात कोठून करावी ?

(ग) उत्पादन-वृद्धि, शेती, खादी, अन्य उद्योग

(घ) शोषण-दमन-मुक्ति

(च) स्वस्थ पारिवारिक जीवन

(छ) सुखी सामाजिक संबंध.

(३) आपल्या गावाचे आपल्या क्षेत्रात, जिल्ह्यात, राज्यात व देशातील स्थान, जगाशी संबंध, दुसऱ्या संस्था, दुसरीं गावे व सरकार याच्याशी संबंध

(४) शेजारच्या गावाची ग्रामदान-प्राप्ति—
पंचायत, ब्लॉक, जिल्हा, राज्य व देश या स्तरावर ग्रामदान संगठन.

(५) गावाच्या भूमिकेत सर्वांचे लोकतंत्र, सर्वांचा समाजवाद.

मोबदल्यात खादी इत्यादि, जमाखर्च, विणकर-बाजार

(२) प्रथमोपचार

(३) सफाई-गड्डा, पायखाना, मुतीघर

(४) झगड्याचे शांतिपूर्ण निरसन

(५) परसातील बागाईत (भाजीपाला)

(६) दैनंदिनी-लेखन, दुसऱ्याना विचार समजावून सांगणे, ग्रामशाळा-संचालन